# चंद्रशेखर.

हें पुस्तक

श्रीयुत राय बांकिमचंद्र बहादुर यांच्या
मूळ बंगाली पुस्तकावरून

रा. रा. बापू नरसिंह भावे

सहकारी संपादक कादंबरीकल्पद्रुम

यांनीं मराठींत लिहिलें.

तें

चितळे आणि मंडळी, वांई

यांनीं

वांई येथें " मोदवृत्त " छापखान्यांत

छापिलें.

हें पुस्तक

गुरुवर्य रावसाहेब

रामकृष्ण सखाराम आठवले, एम्. ए.

सुपरिन्टेंडंट स्टेट एजुकेशन इंदोर व तुको-

जीराव होळकर कॉलिजांतील

गणितशास्त्राचे प्रोफेसर

यांस

त्यांच्या मजवरील अहेतुक प्रेमास्तव

अत्यादरानें

अर्पण केलें आहे.

पुस्तककर्ता.



# प्रस्तावना.

भारतवर्षांत प्रस्तुत कालीं प्रचलित असलेल्या सर्व देशी भाषांच्या वाङ्मयांत वङ्गवाङ्मयाचा नंबर बहुतेक पहिला आहे असें ह्मणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. कारण, ह्या भाषेंत सर्व तऱ्हेच्या विषयांवर स्वतंत्र आणि भाषांतररूप असे अनेक ग्रंथ झाले आहेत व होत आहेत. त्यांत कादंबऱ्यांचा भरणा तर विशेषच झाला असून त्यांतील बहुतेक कादंबऱ्या पाश्चात्य कादंबरी ग्रंथांच्या तोडीच्या किंबहुना त्यांहूनही सरस अशा उतरल्या आहेत. कादंबरीकारांत कै० रायबंकिमचंद्र बहादुर हे अग्रगण्य असून त्यांना Sir Walter Scott of Bengal अशी बहुमानाची पदवी देण्यांत येते. प्रस्तुतचें चंद्रशेखर हें त्यांच्याच एका उत्कृष्ट कादंबरीचें भाषांतर आहे. सदरहु पुस्तक आरंभीं "वङ्गदर्शन" नामक मासिकपुस्तकांतून प्रसिद्ध झालें होतें.

ह्यांतील कथाभाग प्रचलित इतिहासास सर्वस्वीं धरून आहे असें नाहीं. सयेकृत "मताक्षरीन्" नामक एक पारशी ग्रंथाचें इंग्रजींत भाषांतर झालेलें आहे; त्या ग्रंथाचा या पुस्तकाला आधार घेतला आहे. वर सांगितलेला ग्रंथ अति दुर्मिळ झाला आहे व त्याची पुन्हां आवृत्ति निघेल तर इतिहासवाचकांना त्याचा फार उपयोग होईल.

प्रस्तुतचें भाषांतर होतां होईल तों मुळास न सोडतां व मुळांतील रस यत्किंचितही कमी न होऊं देतां करण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला आहे हें पाहण्याचें काम आह्मी रसिक व मर्मज्ञ वाचकांवरच सोंपवितों.

शेवटीं हें पुस्तक छापविण्याचें काम मोठ्या काळजीनें व विशेष टापटिपीनें केल्याबद्दल आमचे मित्र रा. रा. अनंत केशव चितळे संपादक "कादंबरीकल्पद्रुम" ह्यांचे आभार मानून ही प्रस्तावना पुरी करितों.

सिमुलतला (बंगाल)
१ मे सन १९०१

वा. न. भावे.

# कादंबरी-कल्पद्रुम-पुष्पमाला.



| पुष्प. | किंमत रु. |
|---|---|
| पहिलें–लावण्यमयी ( अ. के. चितळे. ) ... ... ... | ०४ |
| दुसरें–कृष्णकांताचें मृत्युपत्र ( माधवानुज. ) ... ... | ०१२ |
| तिसरें–वीरेन्द्रवीर ( रा. नी. सहस्रबुद्धे. ) ... ... | ०१२ |
| चवथें–युगलांगुलीय ( के. कृ. गोरे. ) ... ... ... | ०४ |
| पांचवें–अकबर ( अ. के. चितळे. ) ... ... ... | ०१२ |
| सहावें–जया ( रा. नी. सहस्रबुद्धे. ) ... ... ... | ०१० |
| सातवें–राधाराणी ( अ. के. चितळे. ) ... ... ... | ०४ |
| आठवें–चंद्रशेखर ( बा. न. भावे. ) ... ... ... | १ |



# चंद्रशेखर.

उपक्रमणिका.

## प्रथम परिच्छेद.

### बालक व बालिका.

भागीरथीतीरावरील एका आम्रकाननांत बसून एक बालक भागीरथीचा सांध्य जलकल्लोल ऐकत होता. त्याच्या पायथ्याशीं एक बालिका हरिततृणशय्येवर पडून मुकाट्यानें त्याच्या तोंडाकडे पहात होती. बालकाचें नांव प्रताप व बालिकेचें नांव शैवलिनी होतें. शैवलिनी ह्यावेळीं सातआठ वर्षांची होती व प्रतापही किशोरवयस्कच होता.

इतक्यांत आकाशामध्यें कावळ्याचें आरडणें सुरू झालें. शैवलिनीनें त्याचें अनुकरण करून सर्व आकाश भरून टाकिलें. नंतर तिनें आपल्या सुकुमार कोमल करांनीं वन्य पुष्पें गोळा करून त्यांची एक माळ केली व ती त्या बालकाच्या गळ्यांत घातली, व पुन्हां ती काढून आपल्या खोप्यांत घातली. लागलींच कांहीं वेळानें तिनें ती आपल्या खोप्यांतून काढून पुन्हां त्याच्या गळ्यांत घातली. माळ कोणीं घालावी ह्याविषयीं तिच्या मनाचा कायमचा निश्चय म्हणून होईना. शेजारींच एक सुंदर गाय चरत होती तिच्या शिंगांत अखेरीस तिनें ती माळ घातली; तेव्हां तिचें समाधान झालें.

संध्याकाळ होतांच आकाशांत तारे चमकूं लागले, तेव्हां तीं दोघें-

जण तारे मोजूं लागलीं. " कोणाला अधिक दिसतें " " कोणाची दृष्टि अधिक तीक्ष्ण आहे " अशा प्रकारचे प्रश्न तीं दोघें आपआपसांत विचारूं लागलीं. " तुला किती तारे दिसताहेत ? " " मला चार दिसताहेत. " " मला पांच दिसताहेत. हा एक, हा एक, हा एक, हा एक, हा एक. " " कांहीं नाहीं, खोटी गोष्ट. तुला फक्त तीनच दिसताहेत ! " असें अखेरीस प्रतापानें शैवलिनीस ह्मटलें.

" तुला किती नावा दिसताहेत सांग पाहूं ? " " सोळा. " " थट्टा नको, अठरा दिसताहेत ना ? " शैवलिनीला पुरे अंक मोजतां येत नव्हते. एक वेळ तिनें मोजून पाहिलें तों त्या नऊ भरल्या ! आणि पुन्हां मोजल्या तों एकवीस भरल्या ! ! नंतर त्यांनीं तो नावा मोजण्याचा नाद सोडून देऊन एकाग्र चित्तानें एका नावेकडेच दृष्टि लाविली. तेव्हां नावेंत काय आहे, ती जाते कोठें, आणि आली कोठून ? वगैरे विचार त्यांच्या मनांत घोळूं लागले.

---

## द्वितीय परिच्छेद.

### बुडालें कोण व निघालें कोण ?

अशा रीतीनें त्या दोघां बालकांचें प्रेम वाढत चाललें. वाटलें तर त्या प्रेमाला प्रणय ह्मणा अगर ह्मणूं नका. सोळा वर्षांचा नायक व आठ वर्षांची नायिका.

बाल्यदशेंतील प्रेमाला कांहीं शाप असावा असें वाटतें. तसें नसतें तर त्या दशेंतील सर्वांचेंच प्रेम अखेरपर्यंत टिकतें. पण तसें घडत नाहीं. वार्द्धक्यांत बाल्यप्रेमाची स्मृति मात्र राहते व बाकीचें सर्व नाहींसें होतें. पण ती नुसती स्मृतीच मनाला किती तरी आनंद देते !

प्रत्येकाला पोरपणीं केव्हांना केव्हां तरी हा अनुभव आलाच असेल

कीं, सहज एखादी सुंदर मुलगी दृष्टीस पडावी व तिजबद्दल नाचावल्या-सारखें होऊन आपण ह्मणावें " अहाहा ! कितीतरी मधुर हें हिचें मुखमंडल ! व डोळ्यांत किती तरी ही विलक्षण खुमारी ! " वारंवार आपण असेंच ह्मणत रहावें. कधीं कधीं खेळ सोडून मध्येंच किती वेळ तरी तिच्या मुखाकडेच पहात रहावें व कधीं तिच्या रस्त्याच्या बाजूला तटस्थ उभें राहून सारखी टक लावीत असावें. कधीं ओळख ना देख असें असून तिच्यावर प्रेम जडावें; व पुढें पहावें तों तें मधुर मुख आणि ते सरल कटाक्ष कालप्रवाहांत कोठें नाहीसे होऊन गेले याचा त्रिखंड शोधिलें तरी पत्ता लागूं नये. केवळ स्मृति मात्र आपल्याजवळ रहावी. ह्यावरून पोरपणच्या प्रेमाला कांहीं तरी शापच असावा हें खास.

शैवलिनी मनांत समजत होती कीं, आपलें प्रतापाशीं लग्न होईल. प्रताप समजत होता कीं तें होणार नाहीं. शैवलिनी व प्रताप हीं दोघें सगोत्रज होतीं, ही गोष्ट शैवलिनी अनदींच विसरली होती.

शैवलिनी घरची गरीब होती. तिला आईशिवाय दुसरें कोणीही नव्हतें. घरची एक लहान झोंपडी व शैवलिनीचें अनुपम सौंदर्य ह्यांशि-वाय दुसरी कांहीं एक जिंदगी त्यांच्याजवळ नव्हती. प्रतापही घरचा गरीबच होता.

शैवलिनी जसजशी वाढत चालली, तसतशी तिची सौंदर्यकांतिही जास्त जास्त खुलत चालली. तथापि तिचा विवाह झाला नाहीं. विवाह ह्मणजे खर्चाचें काम. तो तिच्या आईच्या हातून कसा झेंपणार ? केवळ सौंदर्याला भुलून तिच्याशीं विवाह करण्याला तिच्या झोंपडीचा शोध काढीत कोण येणार ?

कांहीं दिवसांनीं शैवलिनीला चांगलें समजूं लागल्यावर तिला कळून चुकलें कीं, आपल्याला प्रतापाशिवाय सुख होणें नाहीं व प्रताप तर ह्या जन्मीं आपणास मिळण्याची आशा नाहीं.

त्या दोघांचे आपआपसांत गुप्तपणें विचार चालले व अखेरीस त्यांचा

कांहींतरी निश्चय कायम होऊन दोघेंही गंगास्नानास ह्मणून गेलीं. गंगेंत पुष्कळ लोक पोहत होते. प्रताप शैवलिनीला ह्मणाला " शैवलिनि, चल. आपणही पोहूं. " दोघेंही नदींत शिरलीं व पो लागलीं. दोघेंही पोहण्यांत मोठीं तरबेज होतीं. त्या कामांत त्यांची बरोबरी करणारा असा त्या गांवांत कोणीही नव्हता. ते दिवस वर्षाकाळाचे होते. त्यामुळें नदीचा प्रवाह फारच जोरानें वहात होता. त्या तशा प्रवाहांतही तीं दोघें आनंदानें पोहत चाललीं. त्यावेळीं त्या फेनयुक्त शुभ्र प्रवाहांत तीं चंद्ररोहिणीप्रमाणें दिसत होतीं.

पोहत पोहत तीं दोघें फार दूर गेलीं असें पाहून घांटावर असलेल्या लोकांनीं त्यांना हांका मारून परत फिरण्यास सांगितलें. पण तिकडे लक्ष्य न देतां तीं तशींच पुढें चाललीं. लोकांनीं त्यांना पुन्हां हांका मारिल्या, त्यांची निर्भर्त्सना केली, त्यांना शिव्या देखील दिल्या; पण कांहीं नाहीं. तीं तशींच पुढें चाललीं होतीं. फार दूर गेल्यावर प्रताप शैवलिनीस ह्मणाला " शैवलिनि, हेंच माझें लग्न ! "

**शैवलिनी**—तर मग काय येथेंच ?

प्रताप बुडाला.

शैवलिनी बुडाली नाहीं. तिला भय वाटू लागलें. ती मनांत विचार करूं लागली कीं, " मरावें कशासाठीं ? प्रताप माझा कोण ? मला तर भीति वाटूं लागली. माझ्यानें नाहीं प्राण देववत. " शैवलिनी बुडाली नाहीं. ती परत फिरली व पोहत पोहत तीरावर आली.

---

## तृतीय परिच्छेद.

### वर मिळाला.

ज्या ठिकाणीं प्रताप बुडाला त्याच्या जवळूनच एक लहानशी नाव जात होती. प्रताप बुडाला हें त्या नावेवरील एका मनुष्यानें पाहिलें. त्यानें एकदम नदींत उडी टाकिली. उडी टाकणारा मनुष्य चंद्रशेखर होता.

चंद्रशेखरानें पोहत जाऊन प्रतापाला धरिलें व त्यास वर काढून नावेंत बसाविलें. आणि नाव तरीवर आणिल्यावर त्यानें स्वतः बरोबर जाऊन प्रतापाला त्याच्या घरीं पोंचविलें.

प्रतापाच्या आईनें चंद्रशेखरास तसें परत जाऊं दिलें नाहीं. तिनें त्याची विनंति व आर्जव करून त्याला भोजनास राहून घेतलें व त्याचें चांगलेंच आदरातिथ्य केलें. चंद्रशेखरास आंतली गोष्ट कांहीं समजली नाहीं.

शैवलिनीनें पुन्हां प्रतापाला तोंड दाखविलें नाहीं. पण चंद्रशेखरानें तिला पाहिलें व तिला पाहतांच तो मोहित झाला.

चंद्रशेखर ह्यावेळीं मोठ्या काळजींत होता. त्याच्या वयाचीं बत्तीस वर्षे उलटून गेलीं होतीं. तो गृहस्थ होता पण संसारी बनला नव्हता. अद्यापपर्यंत त्यानें दारपरिग्रह केला नव्हता. दारपरिग्रह केला तर ज्ञानार्जनास विघ्न येईल ह्या समजुतीमुळें तो अद्यापि अविवाहितच राहिला होता. तथापि, हल्लीं त्याची आई परलोकवासी झाल्यास सुमारें एक वर्ष झालें होतें, त्यामुळें आतां लग्न न करणें हेंच ज्ञानार्जनास विघ्न आहे असें त्यास वाटूं लागलें. आरंभीं आरंभीं स्वहस्तानें पाकनिष्पत्ति करण्यांत व घरांतील व्यवस्था ठेवण्यांत त्याचा मनस्वी वेळ जाई, व त्यामुळें त्याला अध्ययनाध्यापनास फुरसत रहात नसे. शिवाय घरांत देवपूजा असे, तिकडेही त्याचा बराच वेळ मोडे. अशा रीतीनें भोजनाच्या आणि देवपूजेच्या खट-

पटींत त्याचा सर्व दिवस जाई. त्यामुळें पुस्तकांची हेळसांड होऊं लागली. मिळालेले पैसे कोठें ठेविले, कोणाला दिले, याची तर दादच नसल्यानें खर्चाची तंगाई होऊं लागली. तेव्हां आतां विवाह केला तरच सर्व यथास्थित बंदोबस्त होईल असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें.

विवाह केला तर रूपवती स्त्री करावयाची नाहीं असा मात्र चंद्रशेखराचा निश्चय होता. कारण, रूपवती स्त्री असली तर मनाला मोह पडण्याचा फार संभव. आणि संसारांत तर मोहून जाणें चांगलें नव्हें.

मनांत असे संकल्प चालले असतांनाच शैवलिनी त्याच्या दृष्टीस पडली. तिला पाहतांच त्या संयमीचा व्रतभंग झाला. मग थोडा विचार करून आपल्या मनाची थोडीशी समजूत घालून अखेरीस त्यानें तिच्याशीं लग्न लाविलें. सौंदर्यानें कोण मुग्ध होत नाहीं ?

हें लग्न झाल्यावर आठ वर्षांनीं आमच्या पुढील कथानकाचा आरंभ आहे.

---

( उपक्रमणिका समाप्त. )





# चंद्रशेखर.

## प्रथम खंड.

## पापीयसी.

### प्रथम परिच्छेद.

#### दलनीबेगम.

उदयीक सकाळीं बंगाला, बहार व ओढिसा प्रांताचा अधिपति नबाब अलिजा मीरकासमखान मोंगीरच्या किल्यांत राहणार होता. किल्याच्या अंत:पुरांतील रंगमहाल ह्मणजे एक अप्रतिम स्थान. अद्यापि प्रहर रात्र झाली नव्हती. दिवाणखान्यांतील फरशीवर एक सुंदर गालिचा हंतरला होता. चांदीच्या समयांत सुवासिक तेलाचे दिवे जळत होते. सुगंधी पुष्पांचा वास चोहोंकडे भरून गेला होता. किनखाबाच्या उशीवर डोकें ठेवून एक युवती गुलिस्तान वाचीत पडली होती. तिचें वय सत्रा वर्षांचें होतें. तिची आकृति ठेंगणी असून तिचा बांधा फारच नाजुक आणि सुंदर असा होता. ती गुलिस्तान वाचीत होती व मध्यें मध्यें वर पाहून मनाशींच कांहीं गुणगुणत होती. एकदां " अजूनही कसे आले नाहींत ! " पुन्हां " कशाचे येतात ? हजार दासी आहेत त्यांतलीच मी एक. मजकरितां इतक्या दूर ते कसचे येतात. " अशाप्रकारचे तिचे कांहीं प्रलाप

चालले होते. तिनें पुन्हां वाचण्यास आरंभ केला. थोडा वेळ वाचन झाल्यावर ती पुन्हां ह्मणाली " माझें मन नाहीं लागत. बरें नाहीं आले तर नाहीं; पण माझें स्मरण जरी त्यांना झालें तरी मी जाईन. पण स्मरण तरीं होणार कसें ! हजार दासींपैकींच मी एकना ? " तिनें पुन्हां वाचण्यास आरंभ केला व थोड्या वेळानें हातांतील पुस्तक फेंकून देऊन ती पुन्हां आपल्याशींच बोलूं लागली. ती ह्मणाली " बरें, ईश्वर तरी असें कां करितो ? एखाद्याचें प्रेम एखाद्यावर कां जडवितो ? ही जर त्याची इच्छा ह्मणावी तर हरएक ठिकाणीं परस्परांचें प्रेम परस्परांवर कां जडत नाहीं ? न मिळणारी वस्तु मिळविण्याविषयीं इच्छा कां होते ? " अशा प्रकारें आपणाशीं बोलत बोलत ती युवती उठून उभी राहिली.

नंतर तिनें एक लहान वीणा हातांत घेतला व कोणाला ऐकूं जाऊं नये ह्मणून ती हलक्या सुरांत गाऊं लागली. इतक्यांत जवळच्या शिपायाचा अभिवादनशब्द व भोयांच्या पायांचा आवाज तिच्या कानीं आला. शब्द ऐकतांच ती घाबरली व दारांत जाऊन उभी राहिली. आणि पहाते तों नबाबाचा तांजाम. नबाब मीरकासम अल्ली खान ताजांमांतून खालीं उतरला व महालांत शिरला.

महालांत जाऊन गालिच्यावर बसल्यावर नबाबानें विचारलें " दलनी बीबि, काय गाणें चाललें होतें ? " युवतीचें नांव दौलत उन्नेसा होतें. पण नबाब व इतर सर्व लोक तिला दलिनी बेगम अगर दलनी बीबी असें ह्मणत.

दलनी लाजून खालीं पाहूं लागली. नबाब ह्मणाला " दलिनी, आतां गात होतीस ती चीज पुन्हां गा पाहूं. मला ती ऐकावयाची आहे.

झालें. तिची धांदल उडाली. वीण्याची तार बंद झाली. कांहीं केल्या सूर ह्मणून लागेना. दलनीनें वीणा बाजूस ठेविला व सतार हातीं घेतली; पण ती देखील बेसूरच. नबाब ह्मणाला " कांहीं हरकत नाहीं, ह्याच सतारीवर गा. " दलिनीला वाटलें, नबाब आपणाला गाण्याच्या कामांत अज-

र्दीच अडाणी समजतो. दलिनीनें बोलण्याचा प्रयत्न केला पण तिच्या तोंडातून अक्षर निघेना.

नंतर हातांतील सतार बाजूस ठेवून मोठ्या कष्टानें ती ह्मणाली " मी नाहीं गात." नबाब विस्मित होऊन ह्मणाला " कां ? रागावलीस कीं काय?"

**दलिनी**—कलकत्त्यास इंग्रज लोक ज्या बाजावर गातात, तसला बाजा मला आणून दिल्याशिवाय मी आपल्या समोर गाणार नाहीं.

**मीरकासीम** हंसून ह्मणाला " जर मध्यें कांहीं विघ्न आलें नाहीं, तर अवश्य आणवून देईन.

**दलिनी**—विघ्न कसलें ?

नबाब दुःखी होऊन ह्मणाला " त्यांच्याशीं आपलें वैर सुरू झालें आहे. तुला ही हकीकत माहीत नाहीं वाटतें ?

**दलनी**—आपण एके दिवशीं ह्मणाला होता कीं, इंग्रजांशीं जो वैर करील तो आपलें नुकसान करून घेईल. मग आपण त्यांच्याशीं वैर कां करितां ? मी लहान, आपली दासी, आपल्याला उपदेश करण्याचा मला अधिकार नाहीं. पण आपण मजवर लोभ ठेवितां ह्मणून थोडासा अधिकार पोंचतोही.

नबाब ह्मणाला " दलनि, खरेंच माझें तुजवर प्रेम आहे. तुजवर माझें जसें प्रेम आहे तसें अन्य कोणाही स्त्रीवर नाहीं व तें असावें असें मनांत देखील येत नाहीं.

दलनीच्या शरिरावर रोमांच उभे राहिले. बराच वेळपर्यंत ती स्तब्ध राहिली. तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. नंतर डोळे पुसून ती ह्मणाली " इंग्रजांशीं जो वैर करील तो आपलेंच नुकसान करून घेईल हें ठाऊक असून आपण त्यांच्यांशीं वैर कां करितां ? "

**मीरकासीम** थोड्या मृदु स्वरानें ह्मणाला " आतां माझा उपाय राहिला नाहीं. तुझ्याशीं माझा दुजाभाव नाहीं ह्मणून तुला सांगतों कीं, ह्या कामीं मला राज्यभ्रष्ट व्हावें लागेल. कदाचित् प्राणावरही प्रसंग येईल. मग

त्यांच्याशीं युद्ध कां नाहीं करावयाचें ? इंग्रजांची वागण्याची तऱ्हा पाहिली ह्मणजे वाटतें कीं तेच राजे. मी राजा नव्हे. मग ज्या राज्यांत आपली सत्ता नाहीं त्या राज्याचा उपयोग तरी काय ? केवळ एवढेंच नाहीं तर ते असें देखील ह्मणतात कीं " आह्मी राजे व प्रजापीडनाचा सर्व भार मात्र तुमच्यावर. आमच्या तर्फे तुह्मीं प्रजापीडन करावें. " तर मग आपण प्रजापीडन तेवढें कां करावें ? राज्य करून प्रजेचें जर हित करितां येत नाहीं तर त्या राज्याचा उपयोग काय ! केवळ पापाचा वाटेकरी होण्याकरितां तसें करण्याला मी सुराजउद्दौला नाहीं व मीरजाफरही नाहीं. "

**दलनीनें** मनांतल्यामनांत बंगाधिपतीची मोठी प्रशंसा केली व ती ह्मणाली " प्राणेश्वर, आपण जें काय सांगितलें त्याचर मी काय बोलणार ? परंतु माझी एक आपल्याला विनंति आहे. आपण स्वतः युद्धाला जाऊं नये.

**मीरकासीम**—ह्या कामीं माझें कर्तव्य काय आहे तें मला माहीत आहे. स्त्रियांची मसलत मला नको.

**दलिनीचें** तोंड उतरलें व कांपत कांपत ती ह्मणाली " महाराज, मीं बोलूं नये पण बोललें त्याची क्षमा करा. स्त्रियांना काय बोलावें कसें बोलावें हें कळत नाहीं आणि ह्मणूनच माझ्याकडून हा अपराध घडला. पण माझी आणखी एक विनंति आहे.

" ती कोणची ? "

" युद्धामध्यें आपण मला बरोबर घेऊन चलाल काय ? "

" कां ? तू युद्ध करणार कीं काय ? तसें असेल तर गुरगनखानाला पदच्युत करून त्याच्या जागीं तुझी योजना करितों. "

दलनी अगदीं गांगरून गेली. काय उत्तर द्यावें तें तिला सुचेना. तेव्हां मीरकासिमानें मोठ्या प्रेमानें तिला विचारलें " काय ! मग आहे इच्छा ? "

" आपण आपल्या बरोबर राहू द्याल तर " मीरकासिमानें ह्या गोष्टीला अनुमोदन दिलें नाही.

त्यानंतर दलनी किंचित हंसून ह्मणाली " जहांपन्हा, आपण ज्योतिष ह्मणतां. तर मग आपणच सांगा कीं मीं युद्धाचे वेळीं कोठें राहूं ? "

मीरकासिम हंसून ह्मणाला " आण तर मग कलमदान. "

दलनीच्या आज्ञेवरून एका दासीनें लागलींच कलमदान पुढें आणून ठेविलें.

मीरकासीम हिंदुलोकांजवळ ज्योतिष शिकला होता. त्यानें तत्काळ एक कुंडली मांडिली. पुढें थोडा वेळ लक्षपूर्वक तिजकडे अवलोकन करून त्यानें ती बाजूस ठेविली व चिंतातुर होऊन तो स्वस्थ बसला. तेव्हां दलिनीनें त्यास विचारिलें " काय निघालें ? "

मीरकासीम ह्मणाला " जें काय निघालें तें मोठें विस्मयकारक आहे. तुला ऐकण्यासारिखें तें नाहीं. "

मीरकासीम तत्क्षणीं बाहेर आला व त्यानें मीरमुनशीला बोलावून आणवून त्याला हुकुम करून ह्मटलें " मुरशिदाबादेहून एका हिंदूला जवळच्या वेदग्रामास पाठवा. तेथें चंद्रशेखर नांवाचा एक विद्वान् ब्राह्मण आहे. त्याच्या जवळ मी ज्योतिष शिकलों. त्याला बोलावून आणून विचारा कीं, जर सध्यां आमचें इंग्रजांशीं युद्ध सुरू झालें तर युद्धाचे वेळीं व युद्धानंतर दलनी बेगम कोठें राहिल ? "

मीरमुनशीनें " जी हुजूर " ह्मणून, चंद्रशेखरास बोलावून आणण्यास मनुष्य पाठविला.



ती काय बोलली हें न समजल्यामुळें तो साहेब ह्मणाला "क्या बोलताहै ?"

**शैवलिनी**—ह्मटलें, यम तुला विसरला कीं काय ?

**साहेब**—यम ! John you mean ? हम् जॉन् नही. हम् लॉरेन्स.

**शैवलिनी**—छान झालें, एक इंग्रजी शब्द समजला. लॉरेन्स ह्मणजे वानर.

त्या दिवशीं संध्याकाळीं शैवलिनीच्या तोंडच्या पुष्कळशा शिव्या खाऊन लॉरेन्स फॉस्टर तेथून निघाला व आपल्या घोड्यावर स्वार होऊन त्वरेनें आपल्या छावणींत गेला.

फॉस्टर निघून गेल्यावर शैवलिनीनें आपली कळशी भरून घेतली व मंदमंद पावलें टाकीत ती आपल्या घरीं आली. आणि घरीं आल्यावर कळशी स्वैपाकघरांत ठेवून शयनगृहांत गेली.

त्या ठिकाणीं तिचा पति चंद्रशेखर एका दर्भासनावर बसून, एका हातांत स्मरणी घेऊन, एका ठाणवईच्या उजेडांत एक ताडपत्रावर लिहिलेली पोथी वाचीत बसला होता. आह्मी ज्या काळची हकीकत लिहीत आहों त्यावर आज १०० वर्षें लोटून गेलीं आहेत.

चंद्रशेखराचें वय सुमारें चाळीस वर्षांचें होतें. त्याचें हाडपेर चांगलें मजबूत असून शरिराची ठेवण मोठाडच होती. मस्तक विशाल, व कपाळ प्रशस्त असून त्यावर चंदनाचा तिलक लाविला होता.

"इतकी रात्र कां झाली ?" असें जर घरांतून विचारिलें तर उत्तर काय द्यावें ? असा विचार करीत करीतच शैवलिनी घरांत शिरली. परंतु घरांत जाऊन बराच वेळ झाला तरी चंद्रशेखरानें कांहीं एक विचारिलें नाहीं. तो शंकराचार्यांच्या ब्रह्मसूत्रांतील एका सूत्राचा अर्थ करण्यांत निमग्न झाला होता.

शैवलिनीला एकदम हंसें कोसळलें.

हंसण्याचा आवाज ऐकतांच चंद्रशेखरानें तिजकडे दृष्टि वळवून विचारिलें " आज भलत्या वेळीं विद्युत् दर्शन हें काय ! "

शैवलिनी ह्मणाली " मी समजत होतें कीं, तुह्मी मजवर किती तरी रागावाल. "

**चंद्रशेखर**— रागावयाचें कां ?

**शैवलिनी**— मला घांटावरून येण्यास फार रात्र झाली ह्मणून.

**चंद्रशेखर**— असें काय ? आतांच आलीस वाटतें ? उशीर कां लागला ?

**शैवलिनी**— तेथें एक साहेब आला होता. त्यावेळीं सुंदराबाई मजबरोबर होत्या. त्यांनीं तर मला एकटीला तेथें सोडून पळ काढिला. मी पाण्यांत उभी होतें. मला पळतां येईना. भीतीमुळें मी तशीच पाण्यांत उभी राहिलें व तो गेल्यावर घरीं आलें.

" आतां पुन्हां तो येणार नाहीं. " इतकें बोलून चंद्रशेखर पुन्हां शांकरभाष्यांत निमग्न झाला.

रात्र बरीच होऊन गेली तरीही चंद्रशेखर प्रमा, माया, स्फोट, अपौरुषेयत्व वगैरे विचारांतच निमग्न होता ! शैवलिनीनें नित्यक्रमाप्रमाणें आपल्या पतीचें ताट वाढून ठेविलें व आपलें भोजन आटोपून ती स्वस्थ निजली. असें करण्याला तिला पतीची अनुज्ञा होती. कारण, चंद्रशेखर एकदां वाचण्यांत गढून गेला ह्मणजे त्याला वेळेचें भान रहात नसें.

एकाएकीं दिवाभीताचा घोरगंभीर ध्वनि निघाला. तो ऐकतांच फार रात्र झाली असें समजून चंद्रशेखरानें पोथी गुंडाळिली, व ती जागच्या जागीं ठेवून दिल्यावर आळसानें तो तसाच लवंडला. उघड्या ठेविलेल्या खिडकींतून त्याची दृष्टि कौमुदीयुक्त निसर्गशोभेकडे गेली. खिडकींतून आंत येणारे चंद्रकिरण निजलेल्या शैवलिनीच्या तोंडावर पडले होते. तें पाहून आपल्या गृहरूप सरोवरांत चंद्रप्रकाशानें ती कैरविणीच प्रफुल्लित झाली आहे कीं काय, असा त्याला भास झाला. तो आ-

पल्या झुकेल्या नेत्रांनीं शैवलिनीच्या त्या अनिंद्य सुंदर मुखमंडलाचें पुनः पुनः निरीक्षण करूं लागला. त्यानें पाहिलें तों चित्रविचित्र इंद्रधनुष्याची स्पर्धा करणाऱ्या निबिड कृष्ण भ्रुकुटीखालीं कमळाप्रमाणें तिचे नेत्र निमीलित दिसत होते—व त्यामुळें तिच्या त्या प्रशस्त पापण्यांवर बाहेरून अति कोमल व सूक्ष्म अशा दोन रेषा व्यक्त होत होत्या. तसाच तिनें आपला चिमुकला करपल्लव झोंपेंत गालावर ठेविला होता, त्यावरून जसें फुलावर फूल ठेवावें तसा भास होत होता. मुखमंडलावर हस्त ठेविल्यामुळें सुकुमार, रसपूर्ण व तांबूलरागरक्त ओष्ठाधर किंचित उघडा राहून मोत्यांप्रमाणें शोभणारी तिची दंतपंक्ति थोडीशी नजरेस पडत होती. इतक्यांत कांहीं सुखस्वप्न पडल्यामुळें कीं काय कोण जाणें तिच्या तोंडावर हास्य दिसूं लागलें. त्यामुळें चांदण्यांत जशी वीज चमकावी तसा त्याला भास झाला. पुन्हां तिचें मुख पूर्ववत् शांत दिसूं लागलें. अशा त्या विलासचांचल्यशून्य वीस वर्षांच्या युवतीच्या प्रफुल्ल मुखमंडलाकडे पाहतां पाहतां चंद्रशेखराच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले.

झोंपीं गेलेल्या शैवलिनीच्या सुंदर मुखकांतीकडे पाहून चंद्रशेखर अश्रुं ढाळूं लागला. व ह्मणाला " अरेरे, मीं हिच्याशीं व्यर्थ विवाह केला. ही राजपत्नी होण्यास योग्य. शास्त्राध्ययन करणाऱ्या दरिद्र ब्राह्मणाला हें रत्न काय कामाचें ? तिच्यामुळें मी सुखी झालों आहे हें खरें. पण त्यापासून तिला कसलें सुख ? माझ्या वयावरून पाहतां शैवलिनीची मजवर प्रीति जडणें अगदीं असंभवनीय. व माझ्या प्रेमानें तिची प्रेमोत्कंठा निवारणें शक्य नाहीं. मी नेहेमीं आपल्या पुस्तकांत निमग्न राहणार. शैवलिनीच्या सुखाचा विचार माझ्या मनांत येणार केव्हां ? माझ्या ह्या पुस्तकराशीनें तिला काय सुख मिळणार ? खरोखर मी अति अप्पलपोट्या—केवळ आपल्या स्वतःच्या सुखाकरितां मीं हिच्याशीं लग्न लाविलें. आतां मी काय करूं ? हीं सर्व पुस्तकें नदींत फेंकून देऊन हिच्या सुखाच्या नादीं लागूं ? छे, तें तर होणेंच नाहीं.

तर मग काय ? ह्या बिचाऱ्या निरपराधी युवतीनें माझ्या पापाचें प्रायश्चित्त भोगावें ! तिच्या जन्माचें मातेरें करण्याकरितांच तिच्याशीं लग्न लावण्याची मला दुर्बुद्धि झाली हेंच खास.

असा विचार करितां करितां चंद्रशेखराला भोजन करण्याचीही विस्मृति पडली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मीरमुनशीकडून चंद्रशेखरास निरोप आला कीं, नबाबाच्या कांहीं कामाकरितां तुह्मांला मुर्शिदाबादेस गेलें पाहिजे.

---

## तृतीय परिच्छेद.

### लॉरेन्स फॉष्टर.

वेदग्रामापासून थोड्या अंतरावर असलेल्या पुरंदरपुर नांवाच्या गांवीं ईष्ट इंडिया कंपनीची एक लहानशी रेशमाची वखार होती. फॉष्टर हा तेथील अधिकारी होता. लहानपणींच मेरी फॉष्टरच्या प्रणयाकांक्षेनें हताश झाल्यामुळें त्यानें ईष्टइंडिया कंपनीची चाकरी पतकरिली व तो बंगाल्यांत आला. हल्लीं भारतवर्षांत येणाऱ्या इंग्रज लोकांना ज्याप्रमाणें कित्येक शरीरिक रोग जडतात, त्याप्रमाणें त्या वेळेच्या इंग्रज लोकांना बंगालच्या हवेनें अर्थापहरणरूप जबरदस्त रोग जडत असे. फॉष्टरलाही थोडक्याच वेळांत तो रोग जडला. मेरीची प्रतिमा त्याच्या हृदयांतून पार नाहींशी झाली. एकदां तो कांहीं कामाकरितां वेदग्रामीं गेला होता. तेथें भीमा पुष्करणीच्या जलांत प्रफुल्ल कमलाप्रमाणें दिसणारी शैवलिनी त्याच्या दृष्टीस पडली. साहेब दृष्टीस पडतांच शैवलिनी पळून गेली व फॉष्टर विचार करीत करीत आपल्या वखारीकडे गेला. विचार करितां करितां फॉष्टरनें सिद्धांत केला कीं, घाऱ्या डोळ्यांपेक्षां व पिंगट केंसांपेक्षां

काळे डोळे व काळे केसच चांगले! अकस्मात त्याला वाटलें कीं, स्त्री ही संसारसमुद्रांतील एक नौकाच आहे; सबब प्रत्येकानें ह्या नौकेचा आश्रय केलाच पाहिजे. व ह्मणूनच ह्या देशांत येणारे सर्व इंग्रज लोक आपल्या रीतीभातींचा विचार न करितां बंगाली सुंदरींचें पाणिग्रहण करितात, हें योग्यच आहे. पुष्कळ बंगाली कुमारींनीं धनलोभानें इंग्रजांचें पाणिग्रहण केलें आहे. मग शैवलिनी माझें पाणिग्रहण करणार नाहीं कीं काय ? ह्यावेळीं आपल्या हाताखालील एका कारकुनास बरोबर घेऊन फॉस्टर वेदग्रामीं आला व आपण गावांत न जातां त्यानें आपल्या कारकुनाकडून शैवालिनीच्या घराचा पत्ता वगैरे काढिला.

बंगाली मुलें बागुलबोवाचें नांव ऐकतांच भितात. परंतु कांहीं व्रात्य मुलें " मला बागुलबोवा दाखवा " असा हट्टच घेऊन बसतात. शैवलिनीची तीच अवस्था होती. प्रथम प्रथम फॉष्टरला पहातांच ती भयानें पळ काढीत असे. पण पुढें तिला कोणी सांगितलें कीं, " इंग्रज लोक माणसाला धरून तोंडांत नाहीं टाकीत. इंग्रज ह्मणजे एक अद्भुत प्राणी आहे. एकवेळ त्याजकडे पहा तर खरी. " शैवलिनीनें त्याप्रमाणें केलें, तेव्हां त्यानें कांहीं तिला तोंडांत टाकिली नाहीं. त्या दिवसापासून शैवलिनी फॉष्टरला पाहून पळेनाशी झाली, इतकेंच नव्हे, तर ती हळू हळू त्याजबरोबर भाषणही करूं लागली, हें वाचकांना माहीत आहेच.

शैवलिनी अशुभ वेळीं जन्मास आली होती व अशुभ वेळेवरच तिचा चंद्रशेखराशी विवाह झाला होता. शैवलिनीची हकीकत पुढें सांगू. पण फॉष्टरचे यत्न मात्र विफळ झाले.

थोडक्याच दिवसांनीं फॉष्टरला कलकत्त्याहून हुकूम आला कीं, " पुरंदर पुरच्या कारखान्यावर दुसऱ्या एका साहेबाची नेमणूक झाली आहे, तर तुह्मी ताबडतोब कलकत्त्यास निघून यावें. तुमची नेमणूक दुसऱ्या एका कामावर केली आहे. " ज्याची पुरंदरपुरच्या कारखान्यावर नेमणूक झाली होती तोच साहेब वरील हुकूम घेऊन आला होता. अर्थात्च फॉष्टरला त्वरेनें कलकत्त्यास निघून जावें लागलें.

शैवलिनीचें रूप फॉष्टरच्या मनांत खिळून राहिलें होतें. तिची आशा सोडून जाणें त्याच्या मोठें जिवावर आलें. ह्यावेळीं बंगाल्यांत जे इंग्रज रहात होते ते दोन गोष्टी करण्यास फार अक्षम असत. एक लोभसंवरण व दुसरी पराभवस्वीकार. अमुक एक गोष्ट अशक्य असें ते कधींही कबूल करीत नसत, व अमुक गोष्ट करण्यांत पाप आहे सबब ती गोष्ट करूं नये हा विचारहीं त्यांच्या मनांत कधीं येत नसे. ज्यांनीं भारतवर्षांत इंग्रजी राज्याचा पाया घातला त्यांच्यासारखे कार्यक्षम व स्वेच्छाचारी लोक अखिल भूमंडलावरही कोठें दृष्टीस पडणार नाहींत.

लॉरेन्स फॉष्टरही अशाच पैकीं एक व्यक्ति होती. त्यानें आपला लोभ संवरण केला नाहीं— त्यावेळीं बंगाल्यांत असलेल्या इंग्रज लोकांनीं " धर्म " शद्वाशीं फारकत केली होती. अमुक एक गोष्ट साध्य आहे कीं असाध्य आहे हा विचार त्यांच्या मनांतच येत नसे. त्यांचा मंत्र ह्मटेला ह्मणजे " Now or never. " हा असे.

फॉष्टरनेंही अशाच प्रकारचा कांहीं एक विचार करून कलकत्त्यास निघण्याच्या पूर्व रात्रीं अंधार पडल्यावर आपल्या बरोबर एक बुरख्याची पालखी, चार भोई व कारखान्यांतील कांहीं शिपाई घेतले व तो वेदग्रामीं जाण्यास निघाला.

त्या रात्रीं चंद्रशेखराच्या घरावर दरवडा पडला असें वेदग्रामच्या लोकांना वाटलें. चंद्रशेखर त्या दिवशीं घरीं नव्हता. कारण नबाबाच्या निमंत्रणावरून तो मुर्शिदाबादेस गेला होता. ओरडा ओरड, बंदुकींचे आवाज, व रोदनध्वनि ऐकून लोक बाहेर येऊन पहातात, तों चंद्रशेखराचे घराशीं दरवडेखोरांची धामधुम ! दरवडे खोरांबरोबर पेटलेल्या मशालीही होत्या.. ती स्थिति पाहून लोक घाबरून गेले. पुढें जाण्याची कोणाची छाती होईना. दरवडेखोर घरांतील चीजवस्त घेऊन एक एक निघून गेले व कांहीं भोई त्यांच्यावर बंद केलेली एक पालखी घेऊन गेले. त्यांच्याबरोबर पुरंदरपुरच्या कारखान्यावरील साहेबही होता.

हें सर्व दुरूनच पाहून ते अगदीं भयचकित झाले व स्तब्ध उभे राहिले.

दरवडेखोर निघून गेल्यावर आसपासचे लोक घरांत शिरून पाहूं लागले तों त्यांना आढळून आलें कीं, घरांतील दागदागिने व चीजवस्त बहुतेक सर्व जशीच्या तशीच कायम आहे. पण शैवलिनी मात्र घरांत नाहीं. तेव्हां कोणी ह्मणाले "ती कोठें तरी लपून बसली असेल, ती आतां येईल." त्यांत कितीएक वृद्ध होते ते ह्मणाले "आतां कसची येते ती? आणि आली तरी चंद्रशेखर तिला घरांत कसचा घेतो? आपण जी पालखी पाहिली त्यांतून ती गेली हेंच खास."

कित्येक जण शैवलिनीची वाट पहात तेथेंच उभे राहिले व नंतर तेथेंच बसले. बसल्या बसल्या ते पेंगूही लागले व अखेरीस निराश होऊन निघूनही गेले. पण शैवलिनी आली नाहीं.

वाचकांना पूर्वपरिचित असलेली सुंदरी मात्र सर्वांच्या मागून गेली. सुंदरी ही चंद्रशेखराच्या शेजाऱ्याची मुलगी व त्याची मानलेली बहीण आणि शैवलिनीची मैत्रीण होती. तिची सर्व हकीकत आह्मांला पुढें सांगावयाचीच आहे. पण प्रस्तुत स्थळींही हा थोडासा उल्लेख केला आहे.

सुंदरी उजाडेपर्यंत तेथें बसून नंतर आपल्या घरीं गेली व घरीं जाऊन रडत बसली.

---

## चतुर्थ परिच्छेद.

### नापितानी.

फास्टर साहेब पालखीबरोबरच वेदग्रामापासून बऱ्याच अंतरावर असलेल्या भागीरथीतीरावर येऊन पोहोंचला. तेथें एक नाव तयार होती. त्यानें शैवलिनीला नावेंत बसविलें. नावेवर हिंदु दासदासी व शिपाई यांची योजना केली. आतां हिंदु दासदासी ठेवण्याचें कारण काय? असें वाचकांना वाटेल. पण त्याचा खुलासा पुढें होईल.

खुद्द फॉष्टर साहेब दुसऱ्या नावेंतून कलकत्त्यास गेला. त्याला लौकर कलकत्त्यास पोचलें पाहिजे होतें व मोठ्या नावेंतून एक अठवड्यांत दे-खील कलकत्त्यास जाणें ह्मणजे केवळ अशक्य होतें. त्यामुळें शैवलिनीला लागणाऱ्या प्रवासोपयोगी सर्व सामानाची तयारी करून देऊन तो स्वतः निराळ्या नौकेंतून कलकत्त्यास गेला. आपण बरोबर नसलों तर नाव पकडून कोणी तिला सोडवून घेऊन जाईल अशी शंका देखील त्याला आली नाहीं. इंग्रजाची नौका आहे असें समजल्यावर कोणींही तिच्या वाटेस जाणार नाहीं अशी त्याची खात्री होती. नाव मोंगिरास घेऊन जाण्याबद्दल त्यानें नावाड्यांस सांगितलें होतें.

प्रभातकालच्या मंद वायूनें उत्पन्न होणाऱ्या लहान लहान तरंगमाले-वरून शैवलिनीची ती सुविस्तृत नौका उत्तराभिमुख चालली होती. पा-ण्याच्या लाटांचा नौकेच्या तळावर आघात होत होता. वाचकहो, धूर्त, कपटी, विश्वासघातकी यांजवर तुह्मी वाटेल तितका विश्वास ठेवा. परंतु प्रभातकालच्या वायूवर मात्र बिलकूल विश्वास ठेवूं नका. प्रभातवायु मो-ठा मधुर; पण चोराप्रमाणें तो कधीं कधीं सुवासिक बकुल पुष्पां-वरून, आणि कधीं विकसित कमलांवरून हळू हळू वहात येऊन कोणाचे श्रम परिहार करितो, कोणाला सुवास देतो, कोणाचें चिंता-संतप्त ललाट आर्द्र करितो, व युवतींच्या अलकराजीवर फूत्कार देऊन पळून जातो. नावाड्यांनों, पाहिलेंत ना हा क्रीडाशील प्रभातवायु नदीवर कशा लहान लहान लाटा उत्पन्न करीत आहे व आकाशांत दृष्टीस पड-णाऱ्या काळ्या मेघांना कसा धुडकावून लावीत आहे. तो तीरावरील वृक्षांना कसा नाचवीत आहे, स्नानाकरितां नदींत उतरलेल्या युवतीज-नांशीं कसा एकांतालाप करीत आहे व नौकेच्या तळीं शिरून तुमच्या कानांशीं कसा मधुर गातो आहे ! तुह्मी मनांत समजत असाल कीं, हा वायु मोठा धीरप्रकृति, गंभीरस्वभाव, व आडंबरशून्य आहे. पण हा भ्रम आहे. जगांतील सर्व वस्तु जर दिसतात तशाच असत्या तर मग

काय पाहिजे होतें ? पहा, लहान लहान लाटा कशा वाढत चालल्या ! राजहंसगण त्यावर आनंदानें नाचूं लागले. अंग धुण्यांत निमग्न झालेल्या युवतीजनांच्या कळशा पाण्यावर नाचूं लागल्या. स्नानाकरितां पाण्यांत उतरलेल्या स्त्रीजनांशीं स्पर्धा करणाऱ्या लाटा हळूहळू त्यांच्या स्तनांवर चढूं लागल्या. व स्नान करून तीरावर उभ्या राहिलेल्या स्त्रियांच्या पायाशीं लोळण घेऊन जणूं काय " देहिपदपल्लवमुदारम् " असें म्हणून त्यांची विनवणी करूं लागल्या. विदानपक्षीं त्यांच्या पायांस लाविलेल्या अळित्याच्या रंगानें आपलें अंग माखून घेऊं लागल्या. हळू हळू वाऱ्याचा मृदु स्वभाव नाहींसा होऊन त्याला घोर रूप येत चाललें. दिशा धुळीनें भरून गेल्या व चोहोंकडे अंधार पडला. प्रतिकूल वायूनें नौकांचा मार्ग बंद केला व त्या लाटांच्या जोरानें पाण्यावर मोठमोठे हेलकावे खाऊं लागल्या. अशी स्थिति पाहून नावाड्यांनीं वायुमहाराजास सप्रेम प्रणाम केला व आपआपल्या नौका तीरावर लाविल्या.

शैवलिनी ज्या नावेंत होती त्या नावेचीही तशीच स्थिति झाली. वायूचा वेग फार प्रबल झाला असल्यामुळें नौका मोठी होती तरीही त्या प्रतिकूल वायूपुढें तिचा टिकाव लागेना. सबब नावाड्यांनीं ती भद्रहाटी घाटावर आणून लाविली.

थोडा वेळ गेल्यावर त्या नावेजवळ एक नापितानी ( न्हावीण ) आली. ती एक हलक्या रंगाचें लुगडें नेसली होती व तिच्या हातांत अळित्याचा कापूस ठेविलेली एक टोपली होती. नावेवर पुष्कळसे काळे काळे नावाडी असल्यामुळें तिनें तोंडावर बुरखा घेतला होता. नावाड्यांचा नाईक मुकाट्यानें लक्ष्यपूर्वक त्या न्हाविणीची हालचाल पहात होता.

एका चुलीवर शैवलिनीकरितां स्वैपाक तयार होत होता. स्वैपाक करणारा मनुष्य एक ब्राह्मण होता. कारण शैवलिनीची हिंदुधर्माशीं अद्याप फारकत झाली नव्हती; व ती होणार कशी ! इतके दिवस हाडामांसाशीं खिळलेले आचारविचार एकदम सुटणार कसे ? शैवलिनी जर

पळून गेली नाहीं अगर तिनें जीव दिला नाहीं तर ती कधीं ना कधीं तरी यवनांनीं तयार केलेलें अन्न मोठ्या आनंदानें खाईल अशी फॉस्टरची पूर्ण खात्री होती. मग तो घाई कशाला करील ? वर सांगितल्याप्रमाणें त्याची खात्री असल्यामुळें त्यानें नोकर लोकांच्या सांगण्याप्रमाणें तिच्या तैनातीस ब्राह्मणांचीच योजना केली होती. ब्राह्मण स्वैपाक करीत होता व त्याच्या जवळच एक ब्राह्मण दासी त्याला मदत करण्याला उभी होती. वर सांगितलेली न्हावीण त्या दासीजवळ गेली व तिला ह्मणाली " बाई, तुह्मी कोठून आलां ? " तें ऐकतांच ती दासी रागावली—कारण ती इंग्र-जाकडून पगार खात होती—व ह्मणाली " कोण ग तूं ? आलों आहोंत आह्मी दिल्लीमक्केहून. "

न्हावीण गोंधळून गेली व ह्मणाली " माझा विचारण्याचा हेतु दुसरा तिसरा कांहीं नाहीं. मी जातीची न्हावीण आहे. तुमच्या नविवर मुलीबाळींचें कांहीं काम मिळेल काय ? ह्मणून मी चौकशी करण्यास आलें आहे. "

तें ऐकतांच ती दासी ओशाळली व ह्मणाली " थांब जरा, मी आंतून चौकशी करून येतें. " इतकें बोलून ती शैवलिनीकडे गेली व तिला ह्मणाली " तुझ्या हातापायांना अळिता वगैरे लावावयाचा आहे काय ? " आपलें मन दुसऱ्या कांहीं गोष्टींकडे लागावें अशा विचारांत शैवलिनी बसली होती. तिनें एकदम " हो, लावावयाचा आहे. " असा जबाब दिला. नंतर इतर पहारेवाल्या शिपायांची अनुमति घेऊन त्या दासीनें न्हाविणीस आंत पाठवून दिलें व आपण पूर्वीप्रमाणें आपल्या कामास लागली.

शैवलिनीला पाहतांच त्या न्हाविणीनें आपला बुरखा आणखी थोडा पुढें ओढिला व तिचा पाय आपल्या हातांत घेऊन ती त्याला अळिता लावूं लागली. बराच वेळपर्यंत त्या न्हाविणीकडे लक्षपूर्वक पाहिल्यावर शैवलिनीनें तिला विचारिलें " तूं कोठची राहणारीण ? "

न्हाविणीनें उत्तर दिलें नाहीं. शैवलिनीनें पुन्हां विचारिलें " तुझें नांव काय ? " तरीही उत्तर नाहीं.

" कां तूं रडतेसशी ? "

न्हाविणीनें हळूंच उत्तर दिलें " नाहीं. "

" रडतेच आहेस " असें ह्मणून शैवलिनीनें तिच्या तोंडावरील बुरखा काढून टाकिला. न्हावीण खरोखरीच रडत होती. पण बुरखा काढितांच ती एकदम हंसली.

शैवलिनी ह्मणाली " तूं आल्याबरोबरच मी तुला ओळखिलें. माझ्यासमोर बुरखा ? दैव माझें! दुसरें काय ? बरें पण तूं आलीस कोठून ? "

न्हावीण ही दुसरी तिसरी कोणी नसून शैवलिनीची मैत्रीण सुंदरी होती. सुंदरीनें आपले डोळे पुसले व ती ह्मणाली " त्वरा कर, माझें लुगडें नेस, बुरखा घे व ही अळित्याची टोपली घेऊन बाहेर निघून जा."

शैवलिनी ह्मणाली " तूं आलीस कशी ? "

**सुंदरी**—मी कोठून आलें, कशाला आलें वगैरे सर्व माहिती फुरसतीअंतीं एखादे वेळेस सांगेन. मी ह्या ठिकाणीं तुझ्या संधानावर आलें आहें. तुझी पालखी गंगेच्या तीराकडे गेली आहे असें समजल्यावरून मी कोणाला न कळवितां चालत चालत गंगातीरावर येऊन पोंचलें. तेथें चौकशी करितां लोकांनीं सांगितलें कीं नांव उत्तरदिशेकडे गेली. तेव्हां तशीच मी पाय दमेपर्यंत त्या दिशेकडे चालत निघालें. अखेरीस एक भाड्याची नांव करून तुझ्या नावेचा पाठलाग केला. तुझी नांव मोठी असल्यामुळें जलद चालत नव्हती. पण माझी नाव लहान व हलकी असल्यामुळें आह्मी तुझी नाव तेव्हांच गांठली.

**शैवलिनी**—तूं एकटी कशी आलीस !

" तूं साहेबाच्या पालखींत बसून जशी एकटी आलीस तशीच. " असें सुंदरीच्या मनांतून ह्मणावयाचें होतें. पण असल्या भाषणाचा हा प्रसंग नव्हे असें जाणून ती तसें बोलली नाहीं. ती ह्मणाली " एकटी

आलें नाहीं; माझे पति बरोबर आहेत. आह्मीं आपली नाव दूर सोडिली व मी न्हाविणीचे सोंग घेऊन इकडे आलें.

**शैवलिनी**—पुढें मग ?

**सुंदरी**—पुढें तूं हें माझें लुगडें नेस, हातांत अळित्याची टोपली घे व बुरखा घेऊन नावेंतून निघून जा. तुला कोणीही ओळखणार नाहीं. नंतर नदीच्या कांठाकांठानें जा ह्मणजे माझे पति बसलेली नाव तुझ्या दृष्टीस पडेल. त्यांना पाहून लाजूं नकोस. मुकाट्यानें नावेंत जाऊन बैस. तूं नावेंत बसल्यावर ते तुला तुझ्या घरीं नेऊन पोंचवितील.

बराच वेळ विचार केल्यावर शैवलिनीनें विचारिलें " पण मग तुझी दशा काय होईल ? "

**सुंदरी**—माझ्या संबंधानें फिकीर करूं नकोस. असा कोण समर्थ इंग्रज बंगाल्यांत आहे कीं, जो मला नौकेवर अडकवून ठेवील ? मी ब्राह्मणाची कन्या, ब्राह्मणपत्नी; आह्मी जर मनाचा निर्धार केला तर जगांत आह्मांला कशाचीच भीति नाहीं. तूं जा, मी कोणत्याना कोणत्या रीतीनें रात्रीं घरीं येतें. माझा सर्व भार त्या दयाघन परमेश्वरावर आहे. तो दयाघनच माझा वाली. तूं आतां विलंब लावूं नकोस. त्यांचें ( माझ्या पतीचें ) भोजन अद्याप झालें नाहीं व आज होईल कीं नाहीं तेंही सांगवत नाहीं.

**शैवलिनी**— समज, मी गेलें तर मला घरांत घेतील कां ?

**सुंदरी**—हो, न घ्यायला काय झालें ?

**शैवलिनी**— साहेबानें मला काढून आणलें, आतां माझी जात कोठें राहिली ?

सुंदरी विस्मित झाली व शैवलिनीच्या तोंडाकडे न्याहाळून मोठ्या मार्मिक व तीव्र दृष्टीनें पाहूं लागली. त्याबरोबर गारुड्यानें कांडी दाखवितांच सर्पाची जशी दशा होते, तद्वत् शैवलिनीची दशा होऊन तिनें मान खालीं घातली. सुंदरीनें जरा दरडावून विचारिलें " खरें सांगशील ? "



**शैवलिनी**— हो, सांगेन.

**सुंदरी**— गंगे शपत.

**शैवलिनी**— शपत खरें सांगेन. पण तुला विचारण्याची मी जरूरच ठेवीत नाहीं. मीच होऊन सर्व सांगतें. साहेबाचा मला अद्याप अंगस्पर्श झाला नाहीं. माझ्या पतींनीं जर माझा आतां स्वीकार केला तर त्यांना कांहींएक दोष लागणार नाहीं.

**सुंदरी**— तर मग तुझा पति तुझा अंगिकार करणार नाहीं अशी भीति बिलकुल बाळगूं नकोस. तो धर्मज्ञ आहे, अधर्माचरण त्याच्या हातून कदापिही होणें नाहीं. तर आतां रिकाम्या गप्पांत वेळ घालवूं नकोस.

शैवलिनी अगदीं गप्प बसली. तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. नंतर थोड्या वेळानें डोळे पुसून ती ह्मणाली, " मी जाईन—माझे पतीही माझा अंगिकार करतील—पण मला लागलेला हा कलंक कसा जाईल ?"

सुंदरीनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. शैवलिनी पुन्हां ह्मणाली " शिवाय शेजारच्या मुली मजकडे बोट दाखवून हिलाच एका साहेबानें पळवून नेली होती असें ह्मणून मला वारंवार हिणवितील. परमेश्वरानें असा प्रसंग न आणावा, पण जर मला एखादा मुलगा झाला तर त्याच्या अन्नप्राशनाच्या समारंभाकरितां माझ्या घरीं कोण भोजनास येईल ? व जर कदाचित् मुलगी झाली तर तिच्याशीं कोणता कुलीन ब्राह्मण लग्न करण्यास तयार होईल ? मी अजून अधर्माचरण केलें नाहीं व पवित्र आहे हें कोण खरें मानील ? मी घरीं कोणत्या तोंडानें जाऊं ? "

सुंदरी ह्मणाली " जें दैवीं होतें तें घडून आलें. तें आतां फिरवितां तर येत नाहीं नां ! फार झालें तर जन्मभर दुःख सोसावें लागेल; पण आपल्या घरीं तर राहशील, हें काय थोडें समाधान आहे ? "

**शैवलिनी**—घरीं तरी काय सुख ? कोणत्या सुखाच्या आशेवर इतकें दुःख सोसून घरीं जावयाचें ? न आई न बाप न भाऊबंद—

**सुंदरी**—असें कां ह्मणतेस ? पति तर आहे ना ? मग हा नारीजन्म कशाकरितां ?

**शैवलिनी**—तुला तर सर्व माहितच आहे—

**सुंदरी**—सर्व जगांत तुझ्यासारखी पापिष्ट दुसरी कोणी नाहीं. ज्या पतिसारखा पति सर्व जगांत दुर्लभ त्याच्या प्रीतीचा देखील तुला मोह पडत नाहींना ? कारण मुली जशा आपल्या बाहुल्यांना मोठ्या हौसेनें नटवितात, शृंगारतात, तसें आपल्या बायकोचें कौतुक करण्याचें त्याला ठाऊक नाहीं. कोठून असणार ? ब्रह्मदेवानें त्याला आपला साधा मनुष्यच बनविला आहे. तो धर्मात्मा व पंडित आणि तूं पापिष्ट. तो तुला कशाला आवडेल ? तूं अंधाहून अंध आहेस. तुझ्या पतीची तुजवर जशी प्रीति आहे, तशी प्रीति ह्या जगांत अन्यत्र क्वचितच आढळेल. पण तूं मूढ असल्यामुळें तुला त्याची किंमत कळत नाहीं. तुझें महद्भाग्य ह्मणून असला प्रेमळ पति तुला मिळाला. पण त्या गोष्टी जाऊंदेत. त्यानें जरी तुजवर प्रेम केलें नाहीं तरी त्याची चरणसेवा करून दिवस काढण्यांतच तुझ्या जन्माचें सार्थक आहे. मग आतां उशीर कां ? आटप लवकर. नाहीं तर मला राग येईल.

**शैवलिनी**—हें बघ, मी जेव्हां घरीं होतें तेव्हांच विचार करीत होतें कीं जर कोणा नातेवाईकाचा पत्ता लागला तर त्याच्या घरीं जाऊन रहावें, नाहीं तर काशीस जाऊन भिक्षेवर निर्वाह करावा, नाहीं तर एखाद्या विहिरींत तरी उडी टाकून प्राणत्याग करावा. सध्यां मी मोंगिरास जातें आहे. मोंगिर कसें काय आहे तें पाहीन तरी एकदां. राजधानींत भिक्षा मिळते कीं नाहीं ह्याचा एकवेळ अनुभव घेतें. नाहींतर मरण हें हातचें आहेच. आतां मला मरणाशिवाय दुसरा कोणता मार्ग आहे ? मी जगेन अथवा मरेन; पण पुन्हां घरीं ह्मणून मी जाणार नाहीं हीच माझी प्रतिज्ञा. व्यर्थ तूं मजकरितां इतके कष्ट सोसलेस—जा तूं परत. मी जाणार नाहीं. मी मेलें असें तूं समज. आणि मी प्राणत्याग करणार हें खास. जा तर तूं आतां.

त्यावर सुंदरी कांहीं बोलली नाहीं. नंतर ती उठली व ह्मणाली " तूं लवकर मरशील अशी माझी खात्री आहे. परमेश्वरानें जीव देण्याची तुला लवकर बुद्धि द्यावी अशी मी कायामनोवाक्यें त्याची प्रार्थना करतें. मोंगिरास पोचण्यापूर्वींच मग तुफानांत ह्मण, नाव फुटून ह्मण अगर कोणत्याना कोणत्या तरी रीतीनें मोंगीर गांठण्यापूर्वींच तुला मृत्यु येवो, ह्मणजे झालें.

इतकें बोलून सुंदरी नौकेंतून बाहेर आली व आळत्यांची टोपली फेंकून देऊन पुन्हां आपल्या पतिसन्निध गेली.

---

## पंचम परिच्छेद.

### चंद्रशेखराचें प्रत्यागमन.

चंद्रशेखरानें गणित करून पाहिलें व तो नबाबाच्या अंमलदारांस ह्मणाला " महाराज आपण नबाबाला जाऊन सांगा कीं, मला गणित करून नाहीं सांगतां येत. "

अंमलदारानें विचारिलें " असें कां ? "

चंद्रशेखर ह्मणाला " जर ज्योतिषगणितानें सर्व कांहीं सांगतां आलें तर मनुष्य सर्वज्ञच होईल. शिवाय ज्योतिषांत मी फार प्रवीणही नाहीं. "

अंमलदार ह्मणाला " बुद्धिमान लोक अप्रिय गोष्ट राजाला कळवीत नाहींत, तशांतलें तर कांहीं नाहींना ? बरें तें कांहींही असो, मी आपला निरोप नबाबांच्या कानावर घालतों. "

चंद्रशेखर घरीं जाण्यास निघाला. राजाच्या अंमलदारांनीं त्याच्या बरोबर कांहींएक प्रवाससामुग्री दिली नाहीं. कारण, चंद्रशेखर हा ब्राह्मण असून पंडित होता—पण ब्राह्मणपंडित नव्हे हो—तो दान प्रतिग्रह वगैरे कधींही घेत नसे.

घरीं परत येतांना त्याची नजर दुरूनच घराकडे पोंचली. घर दृष्टीस पडतांच त्याच्या हृदयांत आनंदाचा संचार झाला. चंद्रशेखर हा तत्त्वज्ञ व तत्त्वजिज्ञासू होता. परदेशांतून स्वगृहीं येतांना आपल्या मनाला आनंद होतो ह्यांतलें गूढ काय असावें? या गोष्टीचा तो आपल्या मनाशीं विचार करीत होता. " माझे काय इतके दिवस ( परदेशांत होतों तों ) खाण्या-पिण्याचे हाल होते ? घरीं गेल्यावर तरी विदेशापेक्षां काय अधिक सुख मिळणार आहे ? खरोखर ह्या वयांत आह्मी मायामोहजालांत गुंतून गेलों असतों ह्यांत कांहीं संशय नाहीं. घरीं माझी प्रेयसी भार्या आहे ह्मणून ना इतका आनंद ? हें अखिल विश्व ह्मणजे एकच ब्रह्म ना ? मग एका-वर प्रेमाधिक्य व दुसऱ्यावर अश्रद्धा कां ? सर्वांतरवासी परमेश्वर एकच ना ? मग हा मजबरोबर माझें सामान घेऊन येणारा जो हमाल त्याज-कडे एकवेळ देखील वळून पाहण्याची मला कां बरें इच्छा होत नाहीं ? आणि भार्येचें प्रफुल्ल कमलवदन पाहण्यास मी इतका उत्कंठित कां ? भगवद्वाक्यावर आमची अश्रद्धा नाहीं. पण आह्मी दारुण मोहजालांत पडलों आहों हें खास. व अनंत वर्षे जरी आह्मी जगलों तरी ह्यांतून मुक्त होण्याची आह्मांला इच्छा होत नाहीं, हें कशाचें द्योतक ?"

वरील प्रकारच्या विचारतरंगांत मग्न होऊन चंद्रशेखर वाट चालत असतां अकस्मात् त्याचे मनांत कांहीं भयप्रद कल्पना येऊं लागल्या. " जर मी घरीं गेलों आणि शैवलिनी दिसली नाहीं तर ? पण न दिसा-यला काय झालें ? अजारी असली तर ? अजार हा सर्वांना आहेच— होईल थोड्या दिवसांनीं बरी. बरें पण तिच्या अजाराचा विचार मनांत येतांच माझ्या मनाला इतकें दुःख कां बरें होतें ? कदाचित् तिचा अजार भयंकर असेल ह्मणून !" असा विचार करीत करीत चंद्रशे-खर झपाट्यानें घराकडे पावलें टाकीत चालला होता. " जर शैवलिनी अजारी असली तर परमेश्वर तिला लवकर आराम देईल. पण जर बरी झाली नाहीं तर !" चंद्रशेखराच्या डोळ्यांस घळकन पाणी आलें. त्यानें

मनाशीं विचार केला कीं, " परमेश्वरानें माझ्या ह्या वयांत मला जें असलें अनुपम रत्न दिलें तें कां तो हिरावून घेईल ? पण तसें घडावयाचें नाहीं ह्याचा तरी काय नेम ? माझ्या वांट्याला मुळींच दुःख येऊं नये इतकी परमेश्वराची मजवर कृपा कोठें आहे ? दैवीं असलें तर हेंचसें काय पण ह्याहूनही घोरतर दुःख मला भोगावें लागेल. घरीं गेल्यावर शैवलिनी मेली असें जर माझ्या कानीं पडलें तर मी वांचणार नाहीं. " चंद्रशेखर फार झपाट्यानें चालला होता. गावांत पोहोंचतांच त्याचे शेजारी पाजारी व ओळखीचे लोक त्याजकडे मोठ्या गंभीर मुद्रेनें पाहूं लागले. चंद्रशेख-खराला त्याचा कांहींच उमज पडेना. त्याजकडे पाहून मुलें मनांतल्या मनांत हसूं लागलीं. कांहीं लोक त्याला टाळून जाऊं लागले व वृद्ध लोकांनीं तर त्याजकडे पाहून आपलीं तोंडें फिरविलीं. चंद्रशेखर विस्मित झाला. त्याच्या हृदयांत धडकी भरली. व त्याचें चित्त थाऱ्यावर नस-ल्यासारखें झालें. मग इकडे तिकडे न पहातां झपाट्यानें तो आपल्या घराच्या दाराशीं येऊन पोहोंचला.

घर बंद होतें. त्यानें दारावर थाप मारतांच नोकरानें आंतून दार उ-घडिलें. तेव्हां चंद्रशेखराला पाहतांच त्याला रडें कोसळलें. चंद्रशेखरानें विचारिलें " काय झालें ? " नोकर कांहींएक उत्तर न देतां रडत रडत निघून गेला.

चंद्रशेखरानें मनांत इष्ट देवतेचें स्मरण केलें. तो घरांत पाहूं लागला तों चोहोंकडे केर पडलेला, जळत्या मशाली ठिकठिकाणीं पडलेल्या व ठिकठिकाणचीं दारें मोडलेलीं असा देखावा त्याला दिसला. नंतर तो आंत शिरला व पाहतो तों सर्व दारें बाहेरून बंद असून घरांतील मोलकरीण बाहेर निघून गेलेली ! ती त्याला पाहतांच चटकन् बाहेर निघून आली होती. त्यानें कानोसा घेतला तों बाहेरून तिच्या रडण्याचा ध्वनि त्याच्या कानीं आला. नंतर तो पुन्हां अंगणांत आला व त्यानें मोठ्या आर्त स्वरानें " शैवलिनी " अशी हाक मारिली.

पुन्हां एकवार चंद्रशेखरानें हाक मारिली. पण त्या हाकेचा प्रतिध्वनि मात्र घरांतून ऐकूं आला, दुसरें कांहीं उत्तर मिळालें नाहीं !

ह्यावेळीं शैवलिनीच्या नावेवरील इंग्रजाचें लाल निशाण गंगातीराव-रील वायूनें हवेंत फडकत होतें व नावाडी आनंदानें गात होते.

* * * * *

झालें. चंद्रशेखराला सर्व हकीकत कळली.

नंतर त्यानें आपल्या गृहांतील शालिग्राम मूर्ति मोठ्या कष्टानें सुंद-रीच्या पितृगृहीं नेऊन ठेविली व आपण परत आला. घरांतील सर्व मालमत्ता व चीजवस्त त्यानें गरीब लोकांस वाटून दिली. संध्याकाळप-र्यंत त्यानें हें कृत्य केलें. संध्याकाळ झाल्यावर प्राणापेक्षांही प्रिय अशीं आपलीं सर्व पुस्तकें त्यानें एकत्र केलीं, व त्यांची आंगणांत एक रास घातली. रास घालतां घालतां एखाद्या पुस्तकाचें एखादें पत्र तो उघडून पाही व पुन्हां पुस्तक बांधून ठेवी. रास झाल्यानंतर त्यानें त्याला अग्नि लाविला !

आग भडकली. पुराण, इतिहास, काव्य, अलंकार, व्याकरण वगैरेचे ग्रंथ; तसेच मनु, याज्ञवल्क्य, पराशर, वगैरे स्मृति; न्याय, वेदांत, सांख्य वगैरे दर्शनें; कल्पसूत्र, अरण्यक, उपनिषदें वगैरे सर्व ग्रंथ पेटले ! पुष्कळ प्रयत्नानें मिळविलेले व पुष्कळ दिवस अध्ययन केलेले असे ते अमूल्य ग्रंथ अखेरीस अग्नीच्या मुखीं पडले !

एक प्रहररात्र होईपर्यंत तें ग्रंथदाहाचें काम केल्यावर फक्त अंगावर एक धोतर घेऊन चंद्रशेखरानें आपलें घर सोडिलें ! कोठें गेला तें कोणाला कळलें नाहीं व कोणी चौकशीही केली नाहीं.



# चंद्रशेखर



## द्वितीय खंड



### पाप.



### प्रथम परिच्छेद

#### कुल्सम्

"नाहीं, तो मोर नाचणार नाहीं. तूं आपली गोष्ट चालूं दे कशी." असें ह्मणून दलिनी बेगमेनें जो मोर नाचत नव्हता त्याचें शेंपूट धरून ओढिलें, व आपल्या गळयांतील एक हिरेजडित अलंकार काढून त्याच्या गळ्यांत घातला; व एका बोलक्या काकाकुव्याच्या तोंडावर व डोळ्यावर गुलाब पाण्याची पिचकारी सोडली. काकाकुव्यानें लागलींच "बांदी" अशी शिवी दिली. दलिनीनें स्वतः ही शिवी त्याला शिकविली होती.

जवळच एक परिचारिका मोरानें नाचावें ह्मणून प्रयत्न करीत होती, तिलाच उद्देशून दलिनी ह्मणाली "तूं आपली गोष्ट चालूं दे कशी?"

कुल्सम् ह्मणाली "गोष्ट कसली आली आहे आणखी? हत्याऱ्यांच्या ओझ्यांच्या दोन नौका घाटावर येऊन पोंचल्या आहेत. त्यांतच इंग्रजांचें कांहीं सामानसुमान आहे ह्मणून त्या दोन्ही नावा अडकवून ठेविल्या

आहेत. अलिइब्राहिमखान ह्मणतो आहे कीं नावा सोडून द्या. नावा अडकविल्या तर लागलींच इंग्रजाशीं युद्ध जुंपेल. गुरगनखान ह्मणतो युद्ध जुंपलें तरी हरकत नाहीं; पण नावा सोडावयाच्या नाहींत. "

**दलिनी**—हत्यारें चाललीं आहेत कोठें ?

**कुल्सम्**— अजिमाबादेच्या ( पाटणा ) कारखान्यांत. लढाई जर करितां सुरू झाली तर तेथेंच पहिल्यांदा सुरू होईल. होतां होईल तों ती जागा सोडावयाची नाहीं असा इंग्रजांचा संकल्प असल्यामुळें त्यांनीं तेथें हत्यारें पाठविलीं आहेत. अशी गांवभर दाट वदंता आहे.

**दलिनीः**—मग गुरगनखानानें कोणत्या हेतूनें नावा अडकविल्या आहेत ?

**कुल्सम्**—त्या ठिकाणीं हत्यारें जमवून जर त्यांनीं बंदोबस्त केला तर त्यांना जिंकणें मोठें कठीण जाईल. शत्रूला प्रबल होऊं देतां उपयोगी नाहीं. अलीइब्राहिमखान ह्मणतो आपण इंग्रजांशीं कोठेंही लढाई सुरू केली तरी आपल्याला जय मिळणें शक्य नाहीं. सबब लढाईचा प्रसंगच टाळावा हें उत्तम. मग नावा अडकवून ठेवून लढाईचा प्रसंग कशाला आणावा ? खरें पाहतां इब्राहिमखानाचें ह्मणणें खोटें नाहीं. इंग्रजांच्या पुढें टिकाव लागणें शक्य नाहीं. सुराजउद्दौल्याची जी अवस्था झाली ती अवस्था होण्याचा पुन्हां प्रसंग येणार कीं काय असें मला वाटतें.

दलिनीनें बराच वेळ विचार केल्यावर ती ह्मणाली " कुल्सम्, तुझ्या हातून एक धाडसाचें काम होईल ?

**कुल्सम्**—पक्वान्नांचा बेत अगर गंगाविहार ह्यापैकीं कांहीं काम आहे कीं काय ?

**दलिनी**—गप्प बैस, थट्टा नव्हे, जर करितां ही गोष्ट फुटली तर अलिजा नबाब तुझें व माझें डोकें उडवील.

**कुल्सम्**—फुटली तर ना ? आपण आजपर्यंत इतकीं गुप्त कामें केलीं त्यांतलें एक तरी फुटलें का ? मला वाटतें कीं पुरुषांचे डोळे ह्मणने

केवळ शोभेकरितां आहेत; त्यांचा खरा उपयोग त्यांना मुळींच करतां येत नाहीं. बायकांचीं कारस्थानें व युक्त्या पुरुषांना कधीं कळल्या असें मला तर आठवत नाहीं.

दलिनी—गप्प बैस, माझें बोलणें नोकर चाकर लोकांच्या संबंधाचें नाहीं. नबाब अलिजा इतर लोकांसारखा नाहीं. त्याला कळावयाचें नाहीं असें तूं समजतेस कीं काय ?

कुल्सम्—तर मग मला गुप्त ठेवतां येणार नाहीं कीं काय ? काय करावयाचें आहे तें सांगा.

दलिनी—गुरगनखानाला गुप्तपणें एक पत्र पाठवावयाचें आहे.

हें ऐकतांच कुल्सम् आश्चर्यानें थोडावेळ गप्प राहिली.

कुल्सम्—पत्र कोण लिहिणार ?

दलिनी—मी.

कुल्सम्—हें काय बोलतां ? आपल्याला वेड लागलें कीं काय ?

दलिनी—बहुतेक तसेंच.

उभयतांही स्तब्ध राहिल्या. त्या गप्प बसलेल्या पाहून जवळ असलेले दोन्हीही मोर आपल्या वासयष्टीवर चढून बसले. काकाकुवा भयंकर चीत्कार करूं लागला. व इतर पक्षी आहार करण्यांत निमग्न झाले.

थोडा वेळ गेल्यावर कुल्सम् ह्मणाली " काम अगदीं यःकश्चित् आहे. एखाद्या खोज्याला जर थोडें इनाम दिलें तर तो देखील पत्र पोंचवील. परंतु हें काम मोठ्या धोक्याचें आहे. नबाबाला समजलें तर आपलीं शंभर वर्षें भरलींच. कांहीं असो. परिणाम तुमचा तुह्मी पहा. मी दासी, आपली आज्ञा पाळणें हें माझें काम. द्या तर मग पत्र व थोडीशी नगद. "

नंतर कुल्सम् पत्र घेऊन गेली. ह्या पत्रानेंच विधात्यानें शैवलिनी व दलिनी ह्यांच्या दैवांची सांगड घातली.

---

## द्वितीयपरिच्छेद.

### गुरगनखान.

ज्याच्या जवळ दलिनींचें पत्र गेलें त्याचें नांव गुरगनखान. ह्या- वेळीं बंगाल्यांत जे जे पुरुष अधिकारावर होते, त्या सर्वांत गुरगनखान हा श्रेष्ठ व उत्कृष्ठ होता. तो आरमाणी जातीचा होता. इस्प- हान त्याची जन्मभूमि. असें सांगतात कीं तो पूर्वीं कापडाचा व्यापार करित होता, तरी त्याची बुद्धि व हुषारी फारच विलक्षण होती. नोकरी पतकरिल्यावर थोड्याच दिवसांत तो मुख्य सेनापति झाला, इतकेंच नाहीं तर त्यानें नवीन गोलंदाजं पलटणी तयार केल्या, व युरोपांतील तऱ्हेचें त्यांना लष्करी शिक्षण दिलें. हत्यारें, बंदुका व दारूगोळा वगैरे सामानही त्यानें युरोपावर ताण करण्यासारखें बनविलें. व त्यानें आपली फौज सर्व तऱ्हेनें इंग्रजांच्या तोडीची केली. मीरकासिमाला वाटत होतें कीं, गुरगनखानाच्या साहाय्यानें आपण इंग्रजांना सहज जिंकूं. गुरगनखानाचें महत्वही त्यामुळें फार वाढलें. त्याची मसलत घेतल्याशिवाय मीरकासीम कोणतीही गोष्ट करीत नसे. त्याच्याविरुद्ध जर कोणी कांहीं बोललें तर मीरकासीम ऐकत नसे. गुरगनखान एक नबाबच बनून गेला होता. त्यामुळें मुसलमान अधिकारी फार नाराज झाले.

दोन प्रहर रात्र उलटून गेली होती तरी गुरगनखान निजला नव्हता. तो एका दिव्याजवळ बसून कांहीं पत्रें वाचीत होता. तीं पत्रें कलकत्त्यां- तील कांहीं आरमाणींकडून आलेलीं होतीं. पत्रें वाचून झाल्यावर गुरग- नखानानें एका नोकराला हांक मारिली. त्याबरोबर चोपदार हजर झाला. त्याला गुरगनखान ह्मणाला " सर्व दरवाजे खुले आहेत ना ? "

**चोपदार**—हो, आहेत.

**गुरगन**—ह्यावेळीं मजकडे कोणी आलें तर त्याला तूं कोण, कोठून

आलास कशाला आलास वगैरे प्रश्न करूं नका अशी पाहरेकऱ्याला ताकीद दिली आहेस ना ?

**चोपदार**—जी हुजूर.

**गुरगन**—बरें, आतां जा तूं.

नंतर गुरगनखानानें सर्व पत्रें बांधिलीं व गुप्त ठिकाणीं दडवून ठेविलीं. नंतर तो आपल्या मनाशींच ह्मणूं लागला " आतां कोणता मार्ग पतकरावा ? हें भारतवर्ष ह्मणजे एक मोठा समुद्र आहे. जितक्या बुड्या माराव्या तितकीं रत्नें काढावीं. तीरावरून नुसत्या लाटा मोजीत बसल्यानें काय होणार ? माझीच स्थिति पहा, पूर्वी मी गज गज कापड विकीत होतों. पण आज सर्व भारतवर्षाला माझा धाक आहे. वस्तुतः मीच बंगाल्याचा अधिपति आहे. मी बंगालचा अधिपति ? कोण अधिपति ? अधिपति इंग्रज व्यापारी. मीरकासीम त्यांचा गुलाम, व मी मीरकासिमाचा गुलाम. ह्मणजे मी अधिपतीच्या गुलामाचा गुलाम. केवढें उच्चपद ! पण मी बंगालचा अधिपति होणार नाहीं कशावरून ? माझ्या तोफेच्या माऱ्यापुढें कोण येऊं शकेल ? इंग्रज ! पण ते दिवस गेले. इंग्रजांना देशांतून हांकून दिल्याशिवाय मला अधिपति होता येणार नाहीं. बंगालचा अधिपति होण्याची माझी इच्छा आहे. मीरकासीम मला नको. ज्यादिवशीं माझ्या मनांत येईल त्यादिवशीं त्याला मसनदीवरून खालीं लोटीन. तो केवळ माझ्या उच्चपदारोहणाचा जिना होता. माझा कार्यभाग झाला; आतां त्याला दूर करण्याला काय हरकत आहे? माझे शत्रु कायते इंग्रज. आह्मांला हस्तगत करून घेण्याची त्यांची इच्छा आहे, त्यांना हस्तगत करून घेण्याची आमची इच्छा आहे. पण ते हस्तगत होत नाहींत सबब त्यांना हांकून दिलेच पाहिजेत. सध्यां मीरकासिमाला सिंहासनावर राहूंद्या. त्याला मदत देऊन बंगाल्यांतलें इंग्रज लोकांचें नांव नाहींसें करावें, ह्मणूनच युद्धाचा प्रसंग मी आणीत आहे. पुढें मीरकासिमाला हाकून देऊं. हाच मार्ग चांगला. पण आज हें पत्र एकाएकी कसें आलें ? असलें अवघड साहसाचें काम करण्यास ही ( दलिनी ) कशी तयार झाली ?

अशा रीतीनें तो जिवा विचार करीत होता तों दलिनी बेगमच त्याच्या समोर येऊन उभी राहिली.

" फार दिवसांनीं तुझें दर्शन झालें ह्यामुळें मला मोठा आनंद झाला आहे. तुझा नबाबाच्या जनानखान्यांत प्रवेश झाल्यापासून आपली गांठ पडली नाहीं. पण तूं हें साहसाचें काम करण्यास कशी प्रवृत्त झालीस ? " असें गुरगनखानानें विचारिलें.

**दलिनी**—साहसाचें कसलें ?

**गुरगन**—तूं नबाबाची बेगम असून इतक्या रात्रीं एकटी मजकडे आलीस, हें जर नबाबाला समजलें तर तो आपला दोघांचाही शिरच्छेद करील.

**दलिनी**—जर कदाचित् त्याला समजलें तर आपला दोघांचा काय संबंध आहे तें मीं उघडपणें सांगेन. मग तर तो रागावणार नाहीं ना ?

**गुरगनखान**— तूं अद्याप अज्ञान आहेस ह्मणूनच तुला असें वाटतें. आजपर्यंत आपल्या संबंधाची गोष्ट मी कोठेंच बोललों नाहीं. तुझी व माझी ओळख आहे ही गोष्ट आजपर्यंत न कळवितां केवळ संकटांत पड-ल्यावर कळविली तर ती कोण खरी मानील ? ही केवळ प्राण वांचवि-ण्याकरितां बनवून सांगितलेली गोष्ट आहे, असें लोक ह्मणतील. तूं इकडे आलीस ही गोष्ट चांगली झाली नाहीं.

**दलिनी**— नबाबाला कळण्याचा संभव काय ? पाहारेवाले सर्व तुझ्या आज्ञेंतले. तुझा परवाना दाखवितांच त्यांनीं मला अटकाव केला नाहीं. इंग्रजांशीं लढाई होणार ही गोष्ट खरी कीं खोटी ह्याची चौकशी करण्याला मी आलें आहे.

**गुरगन**— ह्याची चौकशी किल्यांतूनच करितां आली नसती का ?

**दलिनी**— आली असती. इंग्रजांशीं युद्ध निश्चित होणार अशी किल्लाभर बातमी आहे. पण ह्या युद्धाला तूं आपली संमति कशी दिलीस ?

**गुरगन**— तूं अद्याप पोर आहेस. त्यांतलें वर्म तुला कसें समजणार?

**दलिनी**—काय मी पोरासारखें बोलत आहे ? मी नबाबाची अर्धांगी आहे. माझें बोलणें अग्राह्य केलें तर कसें होईल ?

**गुरगन**—इंग्रजाशीं युद्ध झालें तर आपणाला काय त्याची फिकीर? व्हायचें असलें तर होईल युद्ध.

**दलिनी**—आपणाला जय मिळेल काय ?

**गुरगन**—आमची जयाची खात्री आहे.

**दलिनी**—आजपर्यंत इंग्रजांना कोणी जिंकलें आहे ?

**गुरगन**—कोणत्या इंग्रजांनीं गुरगनखांशीं युद्ध केलें आहे ?

**दलिनी**—सेराजउद्दौला असेंच समजत होता. पण नकोत त्या गोष्टी आतां. मी पडलें स्त्री. आमच्या मनांत जें येतें तेंच आह्मी खरें मानितों. माझी मनोदेवता सांगते कीं, इंग्रजाशीं युद्ध करण्यांत आपल्याला जय मिळणार नाहीं. ह्या युद्धांत आपला सर्वनाश होईल. ह्मणून मी बिनंति करण्यास आलें आहे कीं; तूं ह्या युद्धाला अनुमति देऊं नकोस.

**गुरगन**—ह्या गोष्टींत स्त्रियांची मसलत कुचकामाची.

**दलिनी**—माझी मसलत ऐकलीच पाहिजे. मला चोहोंकडे अंधार दिसतो आहे. ( असें बोलून दलिनी रडूं लागली. )

गुरगनखान विस्मित झाला. त्यानें विचारलें “ तूं रडतेस कशाकरितां ? मीरकासीम जर राज्यभ्रष्ट झाला तर मी तुला बरोबर घेऊन जाईन. ”

रागानें दलिनीचे डोळे लाल झाले, व ती क्रोधानें ह्मणाली “ मीरकासीम माझा पति हें तूं विसरलास वाटतें ? ”

थोडासा विस्मित व थोडासा ओशाळा होऊन गुरगनखान ह्मणाला “ तें मी विसरलों नाहीं. पण पति जन्माला थोडेच पुरतात. एक पति

गेला तर दुसरा होऊं शकतो. माझी खात्री आहे कीं, तूं कधींना कधीं तरी भारतवर्षांतील दुसरी नूरजहान होणार. "

क्रोधानें दलिनीनें सर्वांग कांपूं लागलें व ती उठून उभी राहिली. आणि डोळ्यांतून वाहणारे अश्रु पुसून कांपत कांपत ह्मणाली " तुझा सत्यानास होवो. व्यर्थ मी तुझी बहीण ह्मणून जन्मास आलें. स्त्रियांना जी ममता, दया व धर्म असतो त्याची तुला कल्पना नाहीं. युद्धाचा विचार जर तूं सोडलास तर बरेंच. नाहीं तर आजपासून तुझा व माझा संबंध नाहीं. संबंध नाहीं कसा ? आजपासून आपला शत्रुसंबंध. आपण एकमेकांचीं हाडवैरी असें आजपासून समजूं. इतकें बोलून दलिनी बेगम तेथून निघून गेली.

दलिनी गेल्यावर गुरगनखान विचार करूं लागला. व नंतर आपणाशींच ह्मणाला " आतां दलिनी आपली राहिली नाहीं; ती मीरकासिमाची झाली. भाऊ ह्मणून वाटलें तर ती मजवर प्रीति करील. पण मीरकासिमावर तिचें अधिक प्रेम आहे. भावाला जर ती पतीचा वैरी समजते आहे तर पतीच्या कल्याणाकरितां ती भावाचा नाश करील ह्यांत संशय नाहीं. तर हिचा आतां किल्यांत प्रवेश होऊं देतां उपयोगाचें नाहीं. " त्यानें नोकराला हाक मारिली; तोंच एक सशस्त्र शिपाई हजर झाला. गुरगनखानानें त्याच्या हातीं पहारेवाल्यांना हुकुम पाठविला कीं, दलिनीला किल्ल्यांत जाऊं देऊं नये.

तो अश्वारोही दूत दलिनीच्या आधीं किल्ल्याच्या दारांत पोंचला. आपल्याला आंत जाण्याची बंदी झाली आहे असें किल्ल्याच्या दारांत पोंचतांच दलिनीला कळलें. तें कळतांच ती मटकन भुईवर बसली. तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले, व ती ह्मणाली " भावानें मला ह्या जगांत राहण्यास कोठेंहीं जागा ठेविली नाहीं. "

कुलसम् ह्मणाली " पुन्हां आपण सेनापतीच्या घरीं जाऊं. "

दलिनी ह्मणाली " तूं जा. गंगेच्या प्रवाहाशिवाय मला आतां दुसरें स्थान नाहीं.

त्या काळोख्या रात्रीं रस्त्यांत उभी राहून दलिनी रडूं लागली. आकाशांत तारे चमकत होते. झाडांवरून विकसित पुष्पांचा सुवास येत होता. मंद वायूनें झाडांचीं पानें वाजत होतीं. दलिनीनें रडत रडत " कुल्सम् " अशी हांक मारिली.

---

## तृतीय परिच्छेद.

### दलिनीचें काय झालें.

बरोबर फक्त एक दासी, रात्रीची वेळ; आणि अशा प्रसंगीं रस्त्यांत उभी राहून राजमहिषी दलिनी रडूं लागली. कुल्सम्नें विचारिलें " आतां आपण काय करणार ? "

दलिनीनें आपले डोळे पुसले व ती ह्मणाली " उजाडेपर्यंत आपण ह्या झाडाखालीं बसूं. "

**कुल्सम्**—उजाडेपर्यंत जर आपण येथें थांबलों तर धरल्या जाऊं.

**दलिनी**—त्याची भीति कशाला ? आपण कोणचें दुष्कर्म केलें आहे ह्मणून आपल्याला भीति ?

**कुल्सम्**—आपण चोराप्रमाणें आपलें ठिकाण सोडून आलों आहों. कोणत्या कारणानें आलों आहों तें फक्त आपलें आपल्याला माहीत आहे; पण लोक काय ह्मणतील व नबाब काय ह्मणेल, ह्याचा विचार करून पहा.

**दलिनी**—लोक काय वाटेल तें ह्मणोत. परमेश्वर आपला वाली आहे. इतरांची मला पर्वा नाहीं. आपलें सांगणें जर लोकांनीं खरें मानिलें नाहीं तर आपल्याला मरावें लागेल, इतकेंच ना ? कांहीं फिकीर नाहीं.

**कुल्सम्**—पण येथें उभे राहण्यांत अर्थ काय ?

**दलिनी**—येथें उभ्या राहिलों तर आपण धरल्या जाऊं ह्मणून.

आपणांला धरावें हीच माझी इच्छा आहे. बरें, पण आपणाला धरल्यावर कोठें घेऊन जातील ?

**कुल्सम्**—दरबारांत.

**दलिनी**—नबाबासमोर ? तेथेंच जाण्याची माझी इच्छा आहे. मला जाण्याला दुसरें ठिकाण नाहीं. त्यानें जरी माझ्या वधाची आज्ञा दिली तरी ऐन मरणाच्या वेळीं मी त्याला सांगेन कीं मी निरपराधिनी आहे. चल, आपण किल्ल्याच्या दाराशींच जाऊन बसूं. तेथें आपल्याला लवकर धरतील.

इतक्यांत त्या तशा काळोखांतून एक दीर्घाकार पुरुषमूर्ति गंगेच्या तीराकडे जात असलेली त्या दोघींच्या दृष्टीस पडली. तिला पाहतांच त्या दोघी फार घाबरल्या व जवळच्या झाडाच्या आड दडून उभ्या राहिल्या. त्यांनीं पुन्हां पाहिलें तों तो दीर्घाकार पुरुष गंगेच्या तीराचा रस्ता सोडून आपल्याचकडे येत आहे असें त्यांना दिसलें. त्याबरोबर त्या अधिकच काळोखांत दडाल्या.

तो पुरुष त्यांच्याजवळ येऊन ठेपला, व " तुह्मी कोण " असा त्यानें प्रश्न केला; व नंतर मोठ्या मृदु स्वरानें तो ह्मणाला " माझ्या प्रमाणेंच रात्रीच्या रात्री जागरण करून रस्त्यांत हिंडणाऱ्या अभागिनी तुह्मी कोण आहां ? "

त्या पुरुषाला पाहतांच त्या स्त्रिया घाबरल्या; पण त्याचा तो मृदु व दयापूर्ण स्वर ऐकून त्यांची भीति दूर झाली. नंतर कुल्सम् ह्मणाली " आह्मी स्त्रिया आहों. आपण कोण ? " पुरुष ह्मणाला " तुह्मी कितीजणी आहां ? "

**कुल्सम्**—आह्मी दोघीजणी आहों.

**पुरुष**—रात्रीच्यावेळीं येथें तुह्मी काय करीत होतां ?

तेव्हां दलिनी ह्मणाली, " आह्मी मोठ्या दुर्दैवी आहों. आमची दुःखाची कहाणी ऐकून आपल्याला काय फायदा ? "

तें ऐकून तो पुरुष ह्मणाला " अगदीं यःकश्चित् मनुष्य देखील प्रसंगीं

एखाद्याच्या उपयोगी पडतो. तुह्मी जर संकटांत आहां तर माझ्या हातून होईल तितकें मी तुमचें संकट दूर करीन. "

**दलिनी**—आमचें संकट दूर होणें असाध्य आहे. आपण कोण ?

**पुरुष**—मी एक सामान्य मनुष्य, दरिद्री ब्राह्मण, ब्रह्मचारी आहें.

**दलिनी**—आपण कोणीही असां, आपलें बोलणें ऐकून आमचा आपल्यावर विश्वास बसला. जो पाण्यांत बुडत आहे तो आधाराची योग्यता अयोग्यता पहात नाहीं. आमच्या दुःखाची कहाणी जर ऐका-वयाची असेल तर हा हमरस्ता सोडून जरा बाजूला चला. रात्रीच्या-वेळीं कोण कोठून येईल ह्याचा नेम नाहीं. आमची हकीकत सर्वांच्या समोर सांगण्यासारखी नाहीं.

नंतर ब्रह्मचारी ह्मणाला " चला तर तुह्मी मजबरोबर " असें ह्मणून दलिनी व कुलसम् ह्यांना बरोबर घेऊन तो शहराच्या रस्त्यानें निघाला, व एका लहान घराशीं येऊन त्यानें दारावर थाप मारिली व " रामच-रण, ह्मणून हांक मारिली. रामचरणानें येऊन दार उघडलें. " दिवा लाव " अशी ब्रह्मचाऱ्यानें त्याला आज्ञा दिली.

रामचरणानें दिवा लावला व ब्रह्मचाऱ्यास साष्टांग नमस्कार घातला. " जा, तूं आतां नीज " असें ब्रह्मचाऱ्यानें रामचरणास सांगितलें. तें ऐकतांच दलिनी व कुल्सम् ह्यांजकडे एकवेळ नजर फेंकून तो निघून गेला. त्या रात्रीं रामचरणाला झोंप आली नाहीं हें सांगण्याची जरूर नाहींच. गुरुजींनीं इतक्या रात्रीं ह्या दोन स्त्रियांना येथें कशाकरितां आणिलें हा विचार त्याच्या मनांत घोळूं लागला. रामचरण आपल्या गुरूला देव व जितेंद्रिय मानीत होता. त्या त्याच्या समजण्यांत मात्र फरक पडला नाहीं. ह्या स्त्रिया नुकत्याच विधवा झाल्या असाव्या आणि त्यांची सहगमनाकडे प्रवृत्ति करण्याकरितांच गुरुजींनीं त्यांना येथें आणिलें असावें असा त्यानें आपल्याला मनाशीं दृढ सिद्धांत केला. आणि " आतांपर्यंत ही गोष्ट माझ्या कशी लक्ष्यांत आली नाहीं " असें तो मनाशींच ह्मणाला.

ब्रह्मचारी आसनावर बसला व त्या स्त्रिया जवळच भुईवर बसल्या. प्रथम दलिनीनें आपण कोण हें सांगितलें व नंतर रात्रीची सर्व हकीकत त्याला यथासांग कळविली.

ती हकीकत ऐकून ब्रह्मचारी मनांत ह्मणाला " भवितव्य कोण टाळूं शकेल ? जें व्हायचें तें कधींही चुकणार नाहीं. पण असें समजून मनुष्यानें प्रयत्न मात्र सोडूं नये. अवश्य कर्तव्य हें केलेंच पाहिजे. "

हाय ! ब्रह्मचारी बोवा, तुह्मी ग्रंथ कां जाळले ? सर्व ग्रंथ जळून जातील, पण हृदयग्रंथ मात्र जळणार नाहीं.

ब्रह्मचारी दलिनीला ह्मणाला " आपण एकदम नबाबापुढें जाऊं नये अशी माझी सल्ला आहे. प्रथम पत्रानें सर्व हकीकत त्याच्या कानावर घालावी. जर आपणावर नबाबाचें प्रेम असेल तर तो आपलें बोलणें खरें मानील. त्याची परवानगी मिळाल्यावर मग आपण त्याच्या समोर जावें.

**दलिनी**—पत्र घेऊन जाणार कोण ?

**ब्रह्मचारी**—मी पाठवून देतों.

दलिनीनें कागद व लेखणी मागितली. ब्रह्मचाऱ्यानें रामचरणास हांक मारिली. कागद व लेखणी आणून ठेऊन तो निघून गेला. दलिनी पत्र लिहूं लागली.

ब्रह्मचारी ह्मणाला " हें घर माझें नव्हें, पण नबाबाची आज्ञा मिळे-पर्यंत आपण खुशाल येथें रहा. आपण येथें आहां हें कोणाला कळणार नाहीं. "

त्या स्त्रियांनीं तें मान्य केलें. पत्र समाप्त करून दलिनीनें तें ब्रह्मचाऱ्याचे हातीं दिलें. त्यांची नीट व्यवस्था ठेवण्याबद्दल रामचरणास ताकीद देऊन तें पत्र घेऊन तो ब्रह्मचारी निघून गेला.

मोंगिरांतील सर्व हिंदू अधिकाऱ्यांशीं ह्या ब्रह्मचाऱ्याचा चांगला परिचय होता. मुसलमान अधिकारीही त्याला ओळखीत असत. एकंदरींत सर्व अधिकारी त्याला मानीत.

मुनशी रामगोविंदराव ह्याची त्या ब्रह्मचाऱ्यावर विशेष भक्ति होती. सूर्योदय झाल्यावर ब्रह्मचारी मोंगिराच्या किल्यांत शिरला, व त्यानें रामगोविंदरायाची गांठ घेऊन दलिनीचें पत्र त्याच्या हातीं दिलें व तो ह्मणाला " माझें नांव सांगूं नका. एका ब्राह्मणानें पत्र आणून दिलें एवढेंच काय तें कळवा ". मुनशी ह्मणाला " उद्यां आपण उत्तराकरितां येथें या. " कोणाचें पत्र हें मुनशीला ठाऊक नव्हतें. ब्रह्मचारी पुन्हां पूर्वी सांगितलेल्या घरीं गेला व दलिनीची गांठ घेऊन उद्या उत्तर येईल. आजचा दिवस येथें रहा " असें ह्मणाला.

रामचरण सकाळीं पहातो तों सहगमनाची कांहींच तयारी नाहीं !

ह्याच घराच्या वरच्या मजल्यावर आणखी एक व्यक्ति निजली होती. तिचा परिचय आह्मांला येथेंच करून दिला पाहिजे. तिचें चरित्र लिहितां लिहितां शैवलिनीचें चरित्र लिहून अपवित्र झालेली आमची लेखणी पुन्हां पवित्र तरी होईल.

---

## चतुर्थ परिच्छेद.

### प्रताप.

सुंदरी मोठ्या रागानें शैवलिनीच्या नावेंतून निघून आली होती. रस्त्यानें येतां येतां ती शैवलिनीला शिव्या देत होती. मरणी, काळतोंडी, अभागी अशा वेचक वेचक शिव्या देत ती घरीं आली, व फार वेळ रडत बसली. नंतर चंद्रशेखर आला व वैतागून विरागी होऊन गेला. ही हकीकत वाचकांना माहीतच आहे. कांहीं दिवस असेच गेले. चंद्रशेखर व शैवलिनी ह्यांची कांहीं बातमी कळली नाहीं. नंतर एके दिवशीं सुंदरी ढाक्याची साडी नेसून अलंकार घालीत बसली होती.

सुंदरी ही चंद्रशेखराच्या शेजाऱ्याची मुलगी व त्याची मानलेली ब-

हीण होती: हें आह्मीं पूर्वीच सांगितलें आहे. सुंदरी नेहेमीं आपल्या बापाच्या घरींच राही. तिचा पति श्रीनाथ हा जरी आतां घरजावई नव्हता तरी तो कधीं कधीं आपल्या सासुरवाडीस येऊन राहत असे. शैवलिनीच्या संकटकालीं तो वेदग्रामींच होता. सुंदरीची आई अजारी व अशक्त होती ह्यामुळें सुंदरीच गृहांतली गृहिणी होती. सुंदरीची एक लहान बहीण होती. तिचें नांव रूपसी. ती सासरीं रहात असे.

वर सांगितल्याप्रमाणें सुंदर साडी नेसून व अंगावर दागिने घालून ती आपल्या पित्याला ह्मणाली " मी रूपसीला भेटावयाला जातें. तिच्या संबंधानें आज मला मोठें वाईट स्वप्न पडलें. " सुंदरीचा पिता कृष्णकमल चक्रवर्ति ह्याचें आपल्या मुलीवर फार प्रेम होतें. त्यानें थोडे आढेवेढे घेऊन तिला जाण्याची परवानगी दिली. सुंदरी रूपसीच्या सासरीं गेली, व श्रीनाथ स्वगृहीं गेला.

रूपसीचा पति कोण ? तोच प्रताप ! शैवलिनीशीं चंद्रशेखराचें लग्न झाल्यावर प्रताप हा वारंवार चंद्रशेखराच्या दृष्टीस पडूं लागला. प्रतापाची चाल व वर्तणुक चंद्रशेखराला फार आवडली. सुंदरीची बहीण रूपसी इजबरोबर त्यानें प्रतापाचें लग्न जुळविलें. इतक्यानेंच झालें नाहीं. चंद्रशेखर हा कासीमअलीखांचा गुरु होता, व त्याची चंद्रशेखरावर मोठी भक्ती होती. त्यामुळें त्यानें ( चंद्रशेखरानें ) प्रतापाला नबाबाच्या दरबारीं नोकरी लावून दिली. प्रताप हा आपल्या गुणांनीं दिवसें दिवस उदयास येऊं लागला. हल्लीं तो जमीदार होता. त्याची हवेली टोलेजंग होती व त्याची कीर्तिही फार झाली होती. सुंदरीचा मेणा त्याच्या हवेलींत शिरला. तिला पाहतांच रूपसी सामोरी गेली व मोठ्या प्रेमादरानें तिला घरांत घेऊन आली. प्रतापही आंत आला व मेहुणीशीं विनोदपर भाषण करूं लागला.

नंतर यथावसर प्रतापानें वेदग्रामची सर्व हकीकत विचारल्यावर अखेरीस चंद्रशेखराची हकीकत विचारिली.

**सुंदरी**—मी तीच हकीकत सांगावयास आलें आहे. ऐक तर.

असें ह्मणून चंद्रशेखर व शैवलिनी ह्यांच्या निर्वासनाचा सर्व वृत्तांत तिनें त्यास सांगितला. तो ऐकून प्रताप विस्मित व स्तब्ध झाला.

थोडा वेळ गेल्यावर मानेला किंचित् हिसडा देऊन रागानें प्रताप सुंदरीला ह्मणाला "इतके दिवस ही गोष्ट तूं मला कशी कळविली नाहींस ?"

**सुंदरी**—तुह्मांला कळविली असती तर काय होतें ?

**प्रताप**—काय होतें ? तूं पडलीस स्त्री. तुझ्याजवळ बढाई मारीत नाहीं; पण जर तूं मला कळविलें असतेंच तर त्याजवर कांहीं उपकार करिता आला असता.

**सुंदरी**—तुह्मी उपकार केला असता कीं नाहीं हें मला कसें कळणार ?

**प्रताप**—माझें सर्वस्व काय तें चंद्रशेखर हें तुला माहीत नाहीं काय ?

**सुंदरी**—ठाऊक आहे. पण मीं असें ऐकिलें आहे कीं लोकांना मोठेपणा व वैभव मिळालें ह्मणजे त्यांना पूर्वस्मृतीचा विसर पडतो.

प्रताप रागावला व मुकाट्यानें निघून गेला. त्याला राग आलेला पाहून सुंदरीला मोठा आनंद वाटला.

दुसऱ्या दिवशीं बरोबर एक आचारी व एक नोकर मात्र घेऊन प्रताप मोंगिराकडे गेला. नोकराचें नांव रामचरण असें होतें. कोठें जातों हें न कळवितां प्रताप निघून गेला. जातांना रूपसीला एवढें मात्र सांगून गेला कीं "मी चंद्रशेखर व शैवलिनी याच्या शोधार्थ जातों. त्यांचा शोध लागल्याशिवाय मी परत येणार नाहीं."

ब्रह्मचारी मोंगिरास ज्या घरांत दलिनीला ठेवून गेला तेंच प्रतापाचें बिऱ्हाड होतें.

कांहीं दिवस भगिनीच्या घरीं राहून सुंदरीनें शैवलिनीला यथेच्छ

शिव्या दिल्या. सकाळीं संध्याकाळीं मध्यान्हीं जेव्हां वेळ मिळेल तेव्हां सुंदरी रूपसीच्या जवळ बसून, शैवलिनीसारखी पापिष्ठ व हतभागिनी ह्या जगांत दुसरी कोणी नाहीं अशी तिची खात्री करीत असे. एके दिवशीं रूपसी ह्मणाली " ताई तूं ह्मणतेंस तें खरें, पण तिच्या करितां तूं इतकी यातायात कां करतेंस ? "

**सुंदरी**— ती मरावी ह्मणून.

**रूपसी**— ताई, तूं तरी मोठी भांडकुदळ आहेस.

**सुंदरी**— तिनेंच तर मला भांडकुदळ केलें आहे.

---

## पंचम परिच्छेद.

### गंगातीरावर.

नबाबाशीं युद्ध करावयाचें असा कलकत्त्याच्या कौन्सिलनें ठराव केला. अजिमाबादच्या वखारींत काहीं शस्त्रांचा पुरवठा करणें ह्यावेळीं फार अवश्य होतें. ह्मणून शस्त्रांनीं भरलेली एक नौका तयार केली.

अजिमाबादच्या वखारीवरील मुख्य अधिकारी इलिस साहेब ह्यालाही कांहीं गुप्त उपदेश पाठविण्याची अवश्यकता होती. नबाबाशीं चाललेला तंटा मिटविण्याकरितां आमिएट साहेब मोंगिरास गेला होता. तेथली हकीकत काय आहे, कशी आहे हें कळल्याशिवाय इच्छित उपदेश इलिसला पाठविण्याची सोय नव्हती. ह्मणून एका चतुर कामगाराला मोंगिरास पाठविण्याची जरूरी होती. त्यानें आमिएट साहेबाची गांठ घेऊन व त्याची मसलत घेऊन इलिस साहेबाकडे जावें व कलकत्त्याच्या कौन्सिलचा व आमिएट साहेबाचा अभिप्राय त्याला कळवावा.

ह्या सर्व कामांकरितां गव्हर्नर वान्सीतार्त यानें फॉष्टरला पुरंदरपुराहून कलकत्त्यास बोलाविलें. फॉष्टरनें शस्त्रांची नौका घेऊन जाऊन आमिएटची गांठ घ्यावी व नंतर अजिमाबादेस जावें असें ठरलें. त्यामुळें कलकत्त्यास येतांच फॉष्टरला पुन्हां पश्चिमेकडे जाणें भाग पडलें. ही बातमी त्याला पूर्वीच कळली होती व ह्मणूनच त्यानें शैवलिनीला अगोदर मोंगीरास पाठविलें. फॉष्टरला मार्गांतच शैवलिनीची नाव भेटली.

शस्त्रांची नौका व शैवलिनीची नौका ह्यांसह फॉष्टर मोंगीरास आला व त्यानें त्या दोन्हीही नावा तीरावर लाविल्या. त्यानें आमिएटची गांठ घेऊन आपला कार्यभाग उरकून घेतला व तो तेथून पुढें जाण्यास निघाला; तों गुरगनखानानें त्याची नौका अडकविली. त्यामुळें नबाब व आमिएट ह्यांच्यामध्यें वादविवाद उपस्थित झाला.

फॉष्टर व आमिएट ह्यांचा असा विचार ठरला कीं, जर नबाबानें नौका सोडून दिली तर बरेंच आहे, नाहींतर नौका सोडून देऊन फॉष्टरनें पाटणास जावें.

फॉष्टरच्या दोन नौका मोंगीरच्या घांटावर बांधल्या होत्या. त्यांपैकीं एक देशी भली मोठी होती व दुसरी जरा सुधारलेली व टुमदार होती. मोठ्या नावेवर नबाबाचे कित्येक शिपाई पाहरा करीत होते. तीरावरही कांहीं शिपाई होते. ह्या नावेंत शस्त्रास्त्रें होतीं ह्मणूनच गुरगनखानानें ती अडकवून ठेविली होती.

धाकट्या नावेंत शस्त्रें वगैरे कांहीं नव्हतें. ती नाव मोठ्या नावेपासून पन्नास हातांच्या अंतरावर होती. तेथें पाहरा वगैरे काहीं नव्हतें. तिच्या छपरावर तेलिंगा जातीचा इंग्रजाचा एक शिपाई होता.

अडीच प्रहर रात्र झाली होती. रात्र काळोखी पण निरभ्र होती. मोठ्या नावेवरील पहारेवाले एकदां उठत, एकदां बसत, एखादे वेळीं डुलक्या घेत. तीरावर निबिड रान होतें. त्यांतून एक मनुष्य कोणाला सें पहात होता. तो पाहणारा मनुष्य खुद्द प्रतापराय होता.

प्रतापानें पाहिलें तों पहारेकरी पेंगताहेत. नंतर तो हळूहळू पुढें आला व पाण्यांत शिरला. पाण्याचा आवाज ऐकून पहारेवाल्यानें पेंगत पेंगतच " हुकुमडर " अशी चौकशी केली. प्रतापरायानें उत्तर दिलें नाहीं. पहारेवाला पुन्हां पेंगू लागला. नावेच्या अंत फॉष्टर जागा होता. त्यानें पाहरेकऱ्याचें वाक्य ऐकून आंतूनच इकडे तिकडे निरीक्षण केलें. तों एक मनुष्य स्नानाकरितां नदींत उतरलेला त्याच्या दृष्टीस पडला.

इतक्यांत त्या निबिड वनांत एकदम बंदुकीचा आवाज झाला. त्या लहान नावेवरील पहारेकरी गोळी लागून नदींत पडला. नंतर ज्या ठिकाणीं नावेची सावली पडली होती त्या ठिकाणीं प्रताप गळ्यापर्यंत पाण्यांत बुडून राहिला.

बंदुकीचा शब्द ऐकल्याबरोबर मोठ्या नावेवरील पहारेकऱ्यांनीं " क्या है रे " असें ह्मणून एकच गोंगाट केला. नावेवरील इतर सर्व लोक जागे झाले, व हातांत बंदूक घेऊन फॉष्टर साहेब नावेच्या बाहेर आला.

त्यानें बाहेर येऊन चोहोंकडे निरीक्षण केलें तों तलिंगा पहारेवाला नाहींसा झालेला व त्याचें प्रेत नदींत तरंगत असलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. नबाबाच्या शिपायांनीं त्याला मारिलें असावें असा त्याला प्रथम भास झाला. पण त्या रानाच्या बाजूला त्याला थोडी धूमरेखा, व हें काय झालें हें पाहण्याकारितां दुसऱ्या नौकेंतील धांवत येत असलेले लोक त्याच्या दृष्टीस पडले. आकाशांत चांदण्या चमकत होत्या, शहरांत दिवे जळत होते. गंगेच्या प्रवाहांत शेंकडों नौका अंधेरांत निजलेल्या राक्षसींप्रमाणें दिसत होत्या; अनंत प्रवाहिनी गंगा खळखळ शब्द करीत वाहत होती, आणि त्याच प्रवाहांत पहारेवाल्याचें प्रेत वाहत चाललें होतें. एका क्षणांत हें सर्व फॉष्टरच्या नजरेस आलें.

त्या निबिड अरण्यांतून धूमरेखा निघालेली पाहून फॉष्टरनें आपली बंदूक हातीं घेतली व त्या वनाच्या बाजूला निशाण धरिलें. याच वनांत शत्रु लपून बसले असावेत व ज्यांनीं अचुक नेम मारून पहारेवाल्याचा

खून केला ते आपलाही खून करतील असें फॉष्टरच्या मनांत आलें. प्लासीच्या युद्धानंतर फॉष्टरसाहेब भारतवर्षांत आला होता. देशी लोक इंग्रजावर नेम धरतील ही शंका त्यानें मनांतून पार हाकून दिली. इंग्रज असून देशी शत्रूला भिणें त्यापेक्षां मरण बरें. अशा विचारानें बंदूक सज्ज करून तो उभा राहिला. पण एका क्षणांत त्या वनांतून एक बंदुकीचा बार निघाला. फॉष्टरच्या डोक्याला गोळी लागली व तो पाहरेवाल्याप्रमाणें गंगेच्या प्रवांहात पडला. त्याच्या हातांतील बंदुक धडधड आवाज करीत नावेंतच पडली.

त्याच वेळीं प्रतापानें आपल्या कमरेस बांधलेली सुरी म्यानांतून बाहेर काढिली व त्या लहान नावेच्या दोऱ्या खसाखस कापल्या. नाव उभी होती त्या ठिकाणीं पाणी थोडें व प्रवाहाचा जोरही कमी असें जाणून नावाड्यांनीं नांगर टाकिले नव्हते, व जरी टाकिले असते तरी प्रतापाला त्याची परवा नसती. एक उडी मारून प्रताप त्या लहान नावेवर चढला.

वरील हकीकत लिहिण्यास जितका वेळ लागला त्याच्या शतांश वेळांत ती घडून आली. पाहरेवाल्याचें पतन, फॉष्टरचें बाहेर येणें, त्याचें पतन व प्रतापाचें नौकारोहण ह्या सर्वांला जितका वेळ लागला तेवढ्या वेळांत दुसऱ्या नौकेवरीड लोक तेथें येऊं शकले नाहींत. पण नंतर थोड्या वेळानें ते येऊन पोंचले.

पाहतात तों प्रताप नांव वल्हवीत चाललेला. नौका पकडण्याकरितां एकानें पाण्यांत उडी टाकिली. तो नावेच्या जवळ येतांच प्रतापानें त्याच्या डोक्यावर वल्ह्याचा प्रहार केला. तो परत फिरला. दुसऱ्या कोणीं पुन्हां तें धाडस केलें नाहीं. प्रतापानें प्रवाहांत नाव नेऊन पूर्वाभिमुख वळविली.

वल्हें हातांत असतांनाच प्रतापानें वळून पाहिलें तों नौकेच्या छपरावर आणखी एक तेलिंगा शिपाई बंदूक उचलीत असलेला त्याच्या नजरेस पडला. प्रतापानें तत्काल वल्हें वर करून त्याच्या हातावर मारिलें तों त्याच्या हातांतलीं बंदूक खालीं पडली. प्रतापानें ती बंदूक व फॉष्टरच्या

" काय झालें, तुला कांहीं समजलें का? "

**पार्वती**—कांहीं नाहीं. लोक बोलत अहेत त्यावरून कळतें कीं नावेवर दरवडा पडला—साहेबाला मारून टाकिलें. आपल्या पापाचें फळ. दुसरें काय ?

**शैवलिनी**—साहेबाला मारून टाकिलें त्यांत आपल्या पापाचें फळ कसलें ? फळ साहेबाच्या पापाचें.

**पार्वती**—दरवडा पडला आहे तर आपल्यावरही संकट येईलच.

**शैवलिनी**—संकट कसलें ? एवढा वेळ एका दरवडेखोराच्या हातीं होतों आतां दुसऱ्याच्या हातीं जाऊं. गोऱ्या दरवडेखोराच्या हातून सुटून काळ्या दरवडेखोराच्या हातीं गेलों ह्यांत काय वाईट झालें ?

असें बोलून, आपल्या खोप्याला हात लावून शैवलिनी थोडीशी हंसली व पलंगावर जाऊन बसली. पार्वती ह्मणाली " ह्या प्रसंगीं तुझें हंसणें मला मुळींच आवडत नाहीं. "

शैवलिनी ह्मणाली " नसेल आवडत तर गंगेंत उडी टाकून जीव दे. माझी हंसण्याची वेळ झाली आहे मी हंसणार. बरें, एखाद्या कोणाला बोलावून तर आण, ह्मणजे काय झालें त्याची आपण चौकशी तरी करूं. "

पार्वती रागानें ह्मणाली " बोलावण्याची कांहीं जरूर नाहीं तेच होऊन येथें येतील. "

तास गेला, दोन तास गेले तरीही कोणीं आंत आलें नाहीं. शैवलिनी फार कष्टी झाली व ह्मणाली " काय आमचें दुर्भाग्य ? दरवडेखोर देखील आमची पूसतपास करण्यास येत नाहींत ". पार्वती भयानें लटलट कांपत होती.

फार वेळ गेल्यावर नाव धक्क्याजवळ येऊन पोंचली, व थोडा वेळ तेथेंच थांबली. नंतर कित्येक लाठीवाले लोक बरोबर एक मेणा घेऊन त्या धक्क्यावर आले. त्यांच्या बरोबर रामचरण होता.

भोयांनीं मेणा धक्क्यावर ठेविला. रामचरण नावेंत चढला व प्रतापा-

च्या जवळ गेला आणि त्याच्या हुकुमावरून नावेच्या खोलींत गेला. पहिल्यानें पार्वती त्याच्या दृष्टीस पडली. नंतर तो शैवलिनीला ह्मणाला " उतरावें आपण. "

शैवलिनीनें विचारिलें " तूं कोण, जायचें कोठें ? " रामचरण ह्मणाला " मी आपला चाकर. काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं. आपण आमच्या बरोबर चला. साहेब मेला. "

शैवलिनी मुकाट्यानें उठली व रामचरणाबरोबर चालू लागली, व त्याच्या बरोबरच नावेच्या खालीं उतरली. पार्वतीही बरोबर जाऊ लागली, पण रामचरणानें तिचा निषेध केला. पार्वती नौकेंतच राहिली. रामचरणानें शैवलिनीस मेण्यांत बसावयास सांगितलें व शैवलिनी बसली. रामचरण मेण्याबरोबर प्रतापाच्या बिऱ्हाडीं गेला. •

दलिनी व कुल्सम् ह्या अद्यापही तेथेंच होत्या. त्यांची झोंप मोडेल ह्मणून, त्या जेथें निजल्या होत्या त्या ठिकाणीं रामचरणानें शैवलिनीस नेलें नाहीं. तो तिला वरच्या मजल्यावर घेऊन गेला. तेथें त्यानें दिवा लाविला व " आपण आतां थोडा आराम करा " असें सांगून व प्रणाम करून दार बंद करून निघून गेला.

शैवलिनीनें विचारिलें " हें कोणाचें घर ? " रामचरणानें तें ऐकिलें नाहीं.

रामचरणानें आपली बुद्धि खर्च करून शैवलिनीला प्रतापाचे घरीं आणून ठेविलें, ह्या गोष्टीला प्रतापाची अनुमति नव्हती. " मेणा जगत्शेटाच्या घरीं घेऊन जा " असें प्रतापानें रामचरणास सांगितलें होतें. रामचरणानें रस्त्यांत विचार केला " ह्यावेळीं जगत्शेटाच्या हवेलीचा दरवाजा उघडा असेल का ? पहारेकरी आपल्याला आंत जाऊं देतील कीं नाहीं ? त्यांनीं विचारलें तर काय ओळख द्यावी? व जर आह्मी सर्व हकीकत सांगितली तर खुनी ह्मणून आह्मांला अडकविणार तर नाहींत ? हें कांहीं उपयोगाचें नाहीं. आतां घरीं जाणें हेंच चांगलें " अशा विचारानें त्यानें मेणा घरींच आणविला.

मेणा गेला असें पाहून प्रताप नावेंतून खालीं उतरला. त्याच्या हातांत बंदूक पाहून अगोदरच सर्व लोक घाबरून गेले होते, व आतां तर लाठीवाले लोक पाहून त्यांची गाळणच उडाली. नावेंतून उतरून प्रताप आपल्या घराकडे निघाला. घराशीं येऊन त्यानें दारावर थाप मारिली. त्याबरोबर रामचरणानें दार उघडिलें. रामचरणानें आपल्या सांगण्याच्या उलट काम केलें हें त्याला घरीं येतांच कळलें. तें ऐकून तो रागावला, व ह्मणाला " आतांच्या आतां शैवलिनीला जगत्शेटाच्या घरीं नेऊन पोंचीव. जा तिला वरून घेऊन ये. "

रामचरणानें वर जाऊन पाहिलें तों—लोकांनीं ऐकिलें तर त्यांना विस्मय वाटेल—शैवलिनी गाढ निजलेली. अशा प्रसंगीं निद्रा येणें असंभव. संभव असंभव आह्मी कांहीं जाणत नाहीं. गोष्ट जशी घडली तशी आह्मी लिहीत आहों. शैवलिनीला जागें न करितां रामचरण प्रतापाकडे आला आणि ह्मणाला " त्यांना झोंप लागली आहे, उठवूं का त्यांना ? " तें ऐकून प्रताप विस्मित झाला व मनांत ह्मणाला " स्त्रियांना निद्रा सोळापट, हें सांगायला चाणक्य पंडित विसरला. " नंतर तो रामचरणास ह्मणाला " आतां घाई करण्याचें प्रयोजन नाहीं. तूं जाऊन नीज. आपल्या कामाचा एक भाग उरकला. मीही थोडी विश्रांति घेतों. "

रामाचरण निघून गेला. अद्यापीही थोडी रात्र शिलक होती. घरांत व शहरांत सर्वत्र सामसुम होती. प्रताप उठला व आपल्या खोलीकडे जावयास निघाला. खोलीजवळ जाऊन त्यानें दार उघडिलें आणि पाहिलें तों पलंगावर शैवलिनी निजलेली. " आपल्याच खोलींत शैवलिनीला निजविली आहे " असें सांगण्यास रामरचण विसरला.

दिव्याचे उजेडानें प्रतापानें पाहिलें तों तेथें श्वेतशय्येवर उमललेल्या फुलांची रास घातली आहे अथवा जशीं कांहीं गंगेच्या शुभ्र प्रवाहावर कमलेंच आहेत असें त्यास वाटलें. तें पाहून प्रतापाच्या नेत्रांचें पारणें फिटलें. कांहीं केल्या त्याची नजर तेथून ढळेना. सौंदर्यानें मुग्ध

होऊन अगर इंद्रियवासना अनावर होऊन तो तिजकडे पहात होता असें नाहीं; तर केवळ भान न राहिल्यामुळें तो वेड्यासारखा पहात राहिला. फार दिवसांच्या गोष्टीची त्याला आठवण झाली आणि अकस्मात् त्याच्या स्मृतिसागरांत लाटांवर लाटा उसळूं लागल्या.

शैवलिनीला निद्रा लागली नव्हती—डोळे मिटून ती आपल्या स्थितीचा विचार करीत पडली होती. तिचे मिटलेले डोळें पाहून तिला झोंप लागली असावी असा रामचरणानें तर्क बांधला. विचारांत अगदीं गढून गेल्यामुळें प्रताप आलेला तिला समजला नाहीं. हातीं बंदूक घेऊन प्रताप खोलींत शिरला. त्यानें बंदूक भिंतीशीं उभी करून ठेविली. पण त्याचें चित्त ठिकाणावर नसल्यामुळें ठेवतां ठेवतांच ती खालीं पडली. तो आवाज ऐकतांच शैवलिनीनें डोळे उघडिले व प्रतापास पाहिलें. नंतर डोळे पुसून ती ऊठून बसली. व मोठ्यानें ह्मणाली.

" हें काय ? तुह्मी कोण ? "

असें ह्मणून शैवलिनी पलंगावर मूर्च्छित पडली.

प्रतापानें पाणी आणिले व तिच्या तोंडावर शिंपलें. त्या वेळीं तें तोंड शिशिरऋतूंत वर दंव पडलेल्या कमलाप्रमाणें शोभूं लागलें. तोंडावर व डोक्यावर शिंपलेलें पाणी केसांवरून ओघळत येऊन खालीं ठिबकूं लागलें त्यामुळें तिचे केसांना शेवाळ लागलेल्या पाची शोभा आली.

लवकरच शैवलिनी शुद्धीवर आली. प्रताप उभा राहिला. शैवलिनीनें मोठ्या स्थिर भावानें विचारिलें " तुह्मी कोण ? प्रताप ? का माझी छळणा करण्याकरितां दुसरें कोणी त्याचें रूप घेऊन आलें आहे ? "

प्रताप ह्मणाला " मी प्रताप. "

**शैवलिनी**—नावेवर तुमचा शब्द ऐकून मला एकवेळ तसा भास झाला खराच. पण त्यावेळीं मला वाटलें कीं तो भ्रम आहे. मी स्वप्न पाहतां पाहतां जागी झालें त्यामुळें मला तसा भ्रम झाला.

असें बोलून शैवलिनीनें एक दीर्घ निश्वास टाकला व ती मुकाट्यानें

बसली. शैवलिनी चांगली शुद्धीवर आली असें वाटून प्रताप जावयास निघाला. शैवलिनी ह्मणाली " जाऊं नका. "

मनांत नव्हतें तरी प्रताप उभा राहिला. शैवलिनीनें विचारिलें " तुह्मी येथें कां आलां ? "

प्रताप ह्मणाला " हें माझें बिऱ्हाड आहे. "

वस्तुतः शैवलिनी स्थिर झाली नव्हती. तिच्या हृदयांत अग्नि पेटला होता. तिचें सर्वांग कांपत होतें. आणखी थोडा वेळ स्वस्थ बसून व आंगीं थोडेसें धैर्य आणून ती पुन्हां ह्मणाली.

" मला येथें कोणी आणिलें ? "

**प्रताप**— आह्मीं आणिलें.

**शैवलिनी**— आह्मी ? आह्मी कोण ?

**प्रताप**— मी व माझा चाकर.

**शैवलिनी**— तुह्मी कशाकरितां मला येथें आणिलें ?

प्रताप अतिशय संतापला आणि ह्मणाला " तुझ्यासारख्या पापिणीचें मुखावलोकन नको. म्लेंच्छांच्या हातून तुझी सुटका केली आणि तूं विचारितेंस मला येथें कां आणिलें ह्मणून ? "

प्रताप रागावला असें पाहून शैवलिनी रागावली नाहीं. तिनें मोठ्या विनयानें व अश्रुपूर्ण नयनांनीं विचारिलें " माझें म्लेंच्छांच्या घरीं राहणें जर तुह्मांला इतकें वाईट वाटलें तर मला तुह्मी तेथल्या तेथें ठार कां नाहीं मारून टाकिली ? तुमच्या जवळ बंदूक देखील होतीच.

प्रताप अधिकच रागावला आणि ह्मणाला " तेंही मीं केलें असतें. पण स्त्रीहत्त्येला भ्यालों. तुला मरणच योग्य आहे. "

शैवलिनी रडूं लागली. व नंतर रडणें आवरून ह्मणाली " मला मरण योग्य खरें—दुसऱ्यांनीं जरी मला वाटेल तें ह्मटलें तरी शोभेल—पण तुह्मी मात्र मला असें बोलूं नका. माझी ही दुर्दशा कोणामुळें ? तुमच्यामुळें. माझें सर्व जीवित अंधारमय कोणीं केलें ? तुह्मी. कोणाच्यामुळें मीं

सुखाची आशा सोडून कुपथसुपथ यांचा विचार सोडून दिला ? तुमच्यामुळें. कोणामुळें मी दुःखिनी झालें ? तुमच्याचमुळें. तुह्मी मला दोष लावूं नका. "

प्रताप ह्मणाला " तूं मोठी पापिणी आहेस ह्मणून तुला दोष देतों. मला दोष ! ईश्वर जाणतो आहे मजकडे बिलकुल दोष नाहीं. मी ईश्वरसाक्ष सांगतों कीं तुला सर्प समजून तुझा मार्ग मीं सोडून दिला. तुझ्या विषाच्या भीतीनें मी वेदग्रामाचा त्याग केला. दोष केवळ तुझा, तुझ्या मतांचा दोष. तूं पापिणी ह्मणूनच मला दोष देतें आहेस. "

शैवलिनी गर्जना करून ह्मणाली " तुह्मी काय केलें ? तुह्मी आपली ही अतुल्य देवमूर्ति माझ्या दृष्टीस कां पाडिली ? माझ्या ऐन यौवनकालीं आपल्या सौंदर्याची अपूर्व ज्योति माझ्यासमोर कां पाजळली ? ज्याची मीं एकवेळ आपणांला विस्मृति पाडली होती. त्याची मला पुन्हां कां आठवण करून दिली ? मीं तुह्माला कां पाहिलें ? पाहिलें तर तुह्मी मला कां प्राप्त झालां नाहीं ? प्राप्त झालां नाहीं तर मी मेलें कां नाहीं ? तुमच्या रूपाचें ध्यान करितां करितांच माझें गृह मला अरण्यवत् झालें, हें तुह्मांला माहित नाहीं का ? तुमच्यासंबंधानें पूर्ण निराशा झाल्यावर देखील तुह्मी कोठें ना कोठें तरी मला दिसाल ह्याच आशेनें मी गृहत्याग केला, हें तुह्मांला माहित नाहीं काय ? नाहीं तर फॉष्टर माझा कोण ? "

हें ऐकून प्रतापाच्या मस्तकावर जणुं वज्रच पडल्यासारखें झालें ! आणि वृश्चिकदंशाच्या वेदना झाल्याप्रमाणें तो तेथून धावतच निघून गेला.

इतक्यांत बाहेरच्या दाराशीं मोठा गोंगाट झाला.

---

## सप्तम परिच्छेद.

### गल्ष्टन् व जॉनसन्.

रामचरण शैवलिनीला नौकेंतून घेऊन गेला व प्रताप नौका सोडून निघून गेला असें पाहून ज्याच्या हातावर प्रतापानें वल्ह्याचा प्रहार केला होता तो तेलंगा शिपाई नावेंतून उतरून धक्यावर आला व ज्या मार्गानें शैवलिनीचा मेणा गेला होता त्या मार्गानें निघाला. बऱ्याच अंतरावरून तो त्या मेण्याच्या पाठोपाठ जात होता. तो जातीचा मुसलमान. त्याचें नांव बकाउल्ला खान होतें. क्लाइव्ह साहेबाच्या बरोबर प्रथम जी देशी सेना बंगाल्यांत आली, ती मद्रासकडून आली होती. ह्मणून इंग्रजाच्या देशी सेनेला बंगाल्यांत तेलंगी ह्मणत. पण हल्लीं पुष्कळ हिंदुस्थानी व मुसलमान लोक इंग्रजांच्या सेनेंत शिरले आहेत. बकाउल्ला गाजीपूरचा राहणारा.

कोणाच्या दृष्टीस न पडतां मेण्याच्या जवळ जवळ राहून बकाउल्ला प्रतापाच्या बिऱ्हाडापर्यंत आला. शैवलिनी प्रतापाच्या घरांत शिरली हें त्यानें पाहिलें व नंतर तो आमिएट साहेबाच्या बंगल्यावर गेला.

बंगल्यावर येऊन पाहतो तों तेथें मोठीच गडबड उडालेली. नावेवरील घडलेल्या प्रसंगाची सर्व हकीकत आमिएटला कळली होती. आमिटनें असें जाहीर केलें कीं, जो कोणी आजच्यारात्रीं दंगेखोरांचा पत्ता लावून देईल त्याला मी हजार रुपये इनाम देईन. बकाउल्ला खानानें नंतर साहेबाची गांठ घेतली व त्याला सर्व हकीकत कळवून ह्मटलें " त्या चोराचें घर मी दाखवितों " आमिएट साहेबाचा चेहरा प्रफुल्लित झाला. त्यानें चार शिपाई व एक नाईक ह्यांना बकाउल्लाखाना बरोबर जाण्याचा हुकुम फर्माविला, आणि सांगितलें कीं " त्या दुष्टांना आतांच्या आतां मजसमोर घेऊन या. " बकाउल्ला ह्मणाला, " मजबरोबर दोन इंग्रज शिपाई द्या—प्रतापराय हा साक्षात् . सैतान आहे—देशी शिपायांच्या हातून तो धरला जाणार नाहीं. "

साहेबाच्या हुकमावरून गलष्टन व जानसन हे दोन सशस्त्र शिपाई बकाउल्लाखानाबरोबर निघाले. निघण्याचे वेळीं गलष्टननें बकाउल्लाखानास विचारिलें:—

" तूं कधीं त्या घरांत गेला होतास का ? "

बकाउल्ला—नाहीं.

गलष्टन जानसनला ह्मणाला " तर मग कंदील व काडयाची पेटी बरोबर घे. हिंदुलोक तेल जाळावयाचे नाहींत, खर्च होईल एखादें. "

जानसननें चोरकंदील व काडयाची पेटी खिशांत घातली.

नंतर इंग्रजलोक जसे लढाईला आवेशानें निघतात, तसे ते निघाले. कोणी कांहीं बोलत नव्हतें. ते चार शिपाई, नाईक व बकाउल्ला मागून चालले होते. शहरांतले पहारेकरी त्यांना पाहून भिऊन दूर सरले. गलष्टन व जानसन बरोबरच्या सर्व लोकांसह प्रतापाच्या दाराशीं पोंचले व त्यांनीं दारावर हळूच थाप मारिली.

रामचरण मोठा अद्वितीय नोकर होता. पाय चेपण्यांत, अंग दाबण्यांत, मालिश ( तेल लावून अंग रगडणें ) करण्यांत तो फार प्रवीण होता. तसेंच वस्त्रें चुणण्यांत, अंगाला उटी वगैरे लावण्यांत तो कुशल होता. त्याच्यासारखा फरास व बाजारसौदा करणारा फारच विरळा. पण हे सर्व सामान्य गुण झाले. लाठीबाजींत मुरशिदाबादप्रांतीं त्याची मोठी ख्याति असे. आपल्या हस्तपराक्रमानें त्यानें पुष्कळ हिंदु व यवन ह्यांना जमिनीवर लोळविलें होतें. बंदुक मारण्यांत तो किती निष्णात होता त्याची हकीकत फॉष्टरच्या रक्तानें गंगाप्रवाहावर लिहून ठेविलीच आहे.

ह्या सर्वांवर ताण व अति उपयोगाचा असा आणखी एक गुण त्याच्या आंगीं होता. तो गुण ह्मणजे धूर्तता. रामचरण कोल्ह्यासारखा धूर्त होता. शिवाय तो विश्वासुक व स्वामिभक्तही होता.

दार उघडण्याकरितां येत असतांना तो मनाशीं ह्मणाला " ह्या वेळीं दारावर कोण थापा देत असावें बरें ? ब्रह्मचारी बोवा असें वाटतें; पण

कोणीही असो, चौकशी केल्याशिवाय रात्रीच्या वेळीं दार उघडणें चांगलें नाहीं. "

असा विचार करून तो मुकाट्यानें दाराच्या जवळ येऊन बाहेर काय चाललें होतें तें ऐकू लागला. बाहेरच्या बाजूस दोघेजण अगदीं लहान आवाजानें एका विपरीत भाषेंत कुजबूज करीत होते. त्या भाषेला रामचरण " इंडिल मिंडिल " ह्मणे. इतर लोक इंग्रजी ह्मणत. रामचरण मनांत ह्मणाला " थांबा बाबानों, हातीं बंदुक घेऊन दार उघडतों. " इंडिल मिंडिल " वर जो विश्वास ठेवील तो मूर्ख. "

नुसत्या बंदुकीनें काम भागायचें नाहीं; तर आपल्या मालकालाही उठवावें, असा विचार करून तो प्रतापाला हाक मारण्याकरितां दारापासून पुन्हां घरांत गेला.

गलष्टन व जानसन बाहेर उभे राहून कंटाळले. जानसन ह्मणाला " आतां वाट कसली पाहतोस, मार लाथ, इंग्रजाच्या लाथेपुढें हिंदुस्थानांतले दरवाजे टिकावयाचे नाहींत. "

गलष्टननें लाथ मारिली. दारांतून खडखड, झणझण असा अवाज निघाला. रामचरण धांवत दाराजवळ आला. दाराचा आवाज प्रतापाच्या कानीं गेला. प्रताप जिना उतरून खालीं येऊं लागला. दार कांहीं मोडलें नाहीं.

नंतर जानसननें लाथ मारिली. दार मोडून पडलें.

" इंग्रजाच्या पदाघातानें सर्व भारतवर्षाचे असेच तुकडे तुकडे होवोत " असें ह्मणत ते दोघे इंग्रज आंत शिरले. त्यांच्या बरोबर शिपाईही आंत आले.

जिन्यावरच रामचरणाची व प्रतापाची गांठ पडली. रामचरण हळुच प्रतापाला ह्मणाला " आपण अंधेरांत लपा, इंग्रज येतो आहे— मला वाटतें आमवाताच्या बंगल्यावरून " रामचरण आमिएटच्या ऐवजीं आमवात ह्मणत होता !

प्रताप—भय कसलें ?

रामचरण—आठजण लोक आहेत.

प्रताप—आपण लपून बसायचें मग येथें ज्या कितीएक स्त्रिया आहेत त्यांची दशा काय होईल ? जा तूं, माझी बंदूक घेऊन ये.

रामचरणाला जर इंग्रजांची विशेष माहिती असती तर त्यानें प्रतापाला दडून बसण्यास सांगितलें नसतें. रामचरण व प्रताप ह्यांचें बोलणें चाललें होतें तितक्यांत सर्व घरभर उजेड पडला. जानसननें कंदील लावून एका शिपायाच्या हातीं दिला. जिन्यावर दोघेजण बोलत उभे आहेत असें त्यांच्या दृष्टीस पडलें. जानसननें बकाउल्ला ह्यास विचारलें "हेच का ?"

त्याला बरोबर ओळखतां येईना, कारण अंधाऱ्या रात्रीं त्यानें रामचरण व प्रताप ह्यांना पाहिलें होतें. पण त्याच्या मोडलेल्या हाताला फार ठणका लागला होता, त्याचा सूड कोणावर तरी उगविण्याकरितां बकाउल्ला ह्मणाला "हो हेच." नंतर वाघाप्रमाणें उडी मारून ते दोघे इंग्रज जिन्यावर गेले. त्यांच्या मागोमाग शिपाई येताहेत असें पाहून प्रतापाची बंदुक आणण्यास रामचरण वर जाऊं लागला.

जानसनच्या तें लक्ष्यांत आलें. त्यानें आपल्या पिस्तुलाचें निशाण रामचरणावर धरून त्याचा पाय जखमी केला. जखम लागतांच तो मट्कन् खालीं बसला.

प्रताप निःशस्त्र होता तथापि पळून जाण्याचें त्याच्या मनांत नव्हतें. शिवाय जरी आपण पळून जाण्याचें मनांत आणिलें तरी रामचरणासारखीच आपली गति होईल हें तो जाणून होता. त्यानें मोठ्या गंभीरपणानें इंग्रजांना विचारिलें "तुह्मी कोण ? आलां कशाकरितां ?" गलस्टननें प्रतापाला विचारिलें "तूं कोण ?"

प्रताप ह्मणाला "मी प्रतापराय ?"

तें नांव बकाउल्ला ह्याच्या ध्यानांत होतें. नौकेवर हातांत बंदुक घे-

ऊन मोठ्या गर्वानें " माझें नांव प्रतापराय " असें प्रताप ह्मणाला होता तें त्याला आठवलें. बकाउल्ला ह्मणाला " जनाब, हीच ती व्यक्ति. "

जानसननें प्रतापाचा एक हात धरिला, गलष्टननें दुसरा धरिला. बळ दाखविण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें पाहून प्रतापानें सर्व कांहीं मुकाट्यानें सहन केलें. नाइकाजवळ हातबिडी होती ती त्यांनीं प्रतापाचे हातांत घातली. जखम लागून पडलेल्या रामचरणाकडे पाहून गलष्टननें विचारलें " हाही होता का ? " " ह्याला ही घेऊन चला. " असा जानसननें दोन शिपायांस हुकुम दिला. शिपाई त्याला घेऊन लागलीच निघाले.

हा सर्व गोंगाट ऐकून दलिनी व कुल्सम् जाग्या झाल्या व त्या फार घाबरल्या. आपल्या खोलीचें दार थोडेसें उघडून त्या हा सर्व प्रकार पहात होत्या. जिन्याशेजारींच त्यांची खोली होती.

जेव्हां गलष्टन व जानसन प्रताप व रामचरण ह्यांना धरून जिना उतरत होते त्यावेळीं अकस्मात् कंदिलाचा प्रकाश दाराच्या फटींतून नीलमण्याप्रमाणें शोभणाऱ्या दलिनीच्या नेत्रांवर पडला. ते नेत्र बकाउल्ला ह्याच्या नजरेस पडले, व तो ह्मणाला " फॉष्टर साहेबाची बिबी ! " गलष्टननें विचारलें " खरेंच कीं काय, कोठें आहे ती ? "

बकाउल्ला ह्यानें त्या दाराकडे बोट दाखविलें आणि तो ह्मणाला, " ह्या खोलींत. "

जानसन व गलष्टन त्या खोलींत शिरले व दलिनी आणि कुलसम् ह्यांना पाहून ह्मणाले " तुह्मी आमच्या बरोबर चला. "

दलिनी व कुल्सम् फार घाबरल्या आणि काय करावें याचें भान न राहून त्या त्यांच्या बरोबर निघाल्या.

त्या घरांत एकटी शैवलिनी राहिली. शैवलिनीनेंही हा सर्व प्रकार पाहिला होता.

## अष्टम परिच्छेद.

### पापाची विचित्र गति.

ज्याप्रमाणें दलिनी व कुलसम् आपल्या खोलीचें दार किंचित् उघडें टाकून बाहेर चाललेला प्रकार पहात होत्या त्याचप्रमाणें शैवलिनीही पहात होती. त्या तिन्हीही स्त्रिया स्त्रीजातिसुलभ कुतूहलानें पीडित झाल्या होत्या. तिघीही भयानें घाबरून गेल्या होत्या. भयाचा हा धर्मच आहे कीं, त्यामुळें भयप्रद वस्तूंच्या दर्शनाची पुनःपुनः इच्छा होते. शैवलिनीनें सर्व प्रकार आरंभापासून अखेरपर्यंत पाहिला. सर्व निघून गेले. घरांत आपण अगदीं एकटी आहों असें पाहून, शैवलिनी बिछान्यावर विचार करीत बसली.

" आतां मी काय करूं ? मी एकटी आहें. त्यांत भीति कसली ? सर्व ब्रह्मांडांत मला भीति नाहीं. मृत्युहून अधिक अशी दुसरी भीति नाहीं. जी स्वतः रात्रंदिवस मृत्यूची वाट पहात आहे तिला भीति कसली ? मला मृत्यु कां येत नाहीं ? आत्महत्या फार सोपी—पण सोपी कोणाला ? इतके दिवस गंगेच्या प्रवाहांत माझें वास्तव्य होतें पण मरण आलें नाहीं. रात्रीच्या वेळीं सर्व लोक निजले असतांना मुकाट्यानें बाहेर येऊन जर मी प्रवाहांत उडी टाकतें, तर मला कोण धरतें ? धरतें. नौकेवर पहारा होता. पण मीच कांहीं उद्योग केला नाहीं. मरणाची इच्छा खरी, पण प्रयत्न मात्र नाहीं. तेव्हांही मरण्याची इच्छा होती—पण नुसत्या इच्छेनें मरण येत नाहीं. पण आज ? आज मरणाचा दिवस खरा. आतां प्रतापाला बांधून घेऊन गेले आहेत, त्याचा निकाल काय होतो तें कळल्याशिवाय मला मरतां यावयाचें नाहीं. प्रतापाचें काय होईल ? कांहीं का होईना, मला काय त्याचें ? प्रताप माझा कोण ? त्याच्या दृष्टीनें मी पापिष्टा—तो माझा कोण ? कोण तें मला ठाऊक नाहीं—तो शैवलिनी पतंगाचा ज्वलंत वन्हि—तो माझ्या संसाररूप वनांतील वणवा—तो माझा मृत्यु.

मीं घर सोडून म्लेंच्छांचा आश्रय कां केला ? सुंदरीच्या सांगण्याप्रमाणें परत कां फिरलें नाहीं ? ”

शैवलिनी आपल्या कपाळावर हात मारून रडूं लागली. वेदग्रामांतील घराची तिला आठवण झाली. तेथें घराच्या पाठीमागें तिनें आपल्या हातानें करवीराचा एक वृक्ष लाविला होता—तोच वृक्ष मोठा होऊन त्याला लाल फुलें आलेलीं आहेत व तो आनंदानें हवेच्या तालावर नाचतो आहे, त्यावर पक्षी येऊन बसले आहेत—त्या वृक्षाची तिला आठवण झाली. तसेंच तें तुळशीवृंदावन, त्याच्या चोहोंबाजूची ती प्रशस्त व स्वच्छ जागा, घरांत पाळलेलें मांजर, व पिंजऱ्यांत ठेवलेले पोपट व मैना, घराच्या पाठीमागील मधुर आंब्याचा वृक्ष हीं सर्व तिला आठवलीं. पुन्हां एक दीर्घ श्वास टाकून ती विचार करूं लागली “ मनांत समजत होतें कीं, घराच्या बाहेर पडतांच प्रताप दृष्टीस पडेल. मनांत आणलें होतें कीं, पुन्हां पुरंदरपूरच्या कोठींत जावें—पुरंदरपूर आणि प्रतापाचें घर हीं दोन्ही जवळ जवळ; कोठीच्या खिडकींत बसून कटाक्षजाल पसरून प्रताप पक्ष्याला धरावें, व वेळ साधून फॉष्टरच्या हातावर तुरी देऊन पळून जावें व प्रतापाच्या पायावर लोळण घ्यावी. मी पिंजऱ्यांतील पक्षी—संसारांतलीं वर्मे मला ठाऊक नव्हती. मनुष्य जोडतो व विधाता मोडतो हें मला माहीत नव्हतें. फॉष्टरचा पिंजरा लोखंडाचा तो माझ्यानें कसला मोडवतो ? हें मला कळलें नाहीं. मोठा कलंक लावून घेतला, जात घालविली व नरकाचें साधन केलें. ” नंतर ती “परलोक ” संबंधीं विचार करूं लागली. “ परलोक ? ” ज्यादिवशीं प्रताप दृष्टीस पडला त्याच दिवशीं मी “ परलोकास ” मुकलें. सर्वांतरवासी परमेश्वरानें त्याच दिवशीं माझ्या कपाळीं नरक नेमिला. ह्या जन्मींही माझ्या दैवीं नरक भोगणें आलें आहे——माझें मनच नरक बनलें आहे. तसें नसतें तर मी इतकें दुःख कां भोगितें ? माझ्याच करितां प्रतापावर एवढें संकट आलें. मी ह्याच्यापूर्वींच मेलें कां नाहीं ? ”

शैवलिनी पुन्हां रडूं लागली. कांहीं वेळ गेल्यावर तिनें डोळे पुसले, भुंवया चढविल्या, व ओंठ चावले. एक क्षणभर तिच्या त्या प्रफुल्ल राजीवतुल्य मुखानें रागावलेल्या सर्पाचें रूप धारण केलें. ती ह्मणाली, " मी मेलें कां नाहीं ? " एकदम तिनें आपल्या कमरेंतील एक पिशवी बाहेर काढली. तींत तीक्ष्ण धारेची एक सुरी होती. तिनें ती सुरी बाहेर काढली.व तिचें पातें उघडून त्या बरोबर ती खेळूं लागली आणि ह्मणाली " उगीच नाहीं सुरी मी जवळ ठेविली ? आजपर्यंत ही मी आपल्या छातींत कशी भोंसकून घेतली नाहीं ? केवळ आशेंत गुंतून. आणि आतां ? " असें ह्मणून सुरीचें टोंक तिनें आपल्या छातीवर ठेविलें. सुरी तशीच तेथें राहिली. शैवलिनी मनांत ह्मणाली " एक दिवस हीच सुरी मी फॉस्टरच्या छातीवर ठेविली होती. त्यादिवशीं मीं त्याला मारिलें नाहीं. मारण्याचें धारिष्टच मला झालें नाहीं. तसेंच आज देखील आत्महत्या करण्याचें धारिष्ट होत नाहीं. मरूं ? आज नको. मरायचें तर वेदग्रामीं जाऊन मरेन. सुंदरीला सांगेन कीं " मला जात नाहीं, कुल नाहीं, हें खरें; पण मला अद्याप एका पापाचा मात्र विटाळ नाहीं. " नंतर मी मरेन. आणि त्यांना–ह्मणजे पतींना–काय सांगून मरूं? तो विचारच मनांत आणवत नाहीं. तो विचार मनांत आणला ह्मणजे काळजाला सहस्र विंचू डसल्याप्रमाणें वेदना होतात व सर्व शरीराला वणवा लागल्यासारखें होतें. मी त्यांना योग्य नव्हतें ह्मणून त्यांना सोडून निघून आलें. त्यामुळें त्यांना क्लेश तर झाले नसतीलना ? त्यांना दुःख झालें असेल ? नाहीं–मी त्यांची कोणी नव्हें. त्यांचें सर्वस्व कायतीं पुस्तकें. ते मजकरितां दुःख करणार नाहींत. हल्लीं ते कसे आहेत, काय करताहेत, हें कोणी मला कळवावें असे माझ्या मनांत फार आहे. त्यांच्यावर मीं कधींही प्रेम केलें नाहीं, पण त्यांच्या जिवाला जर मीं कांहीं दुःख दिलें असलें तर माझ्या पापाचा भार अधिकच जड झाला ह्मणावयाचा. आणखी एक गोष्ट त्यांना कळवायची मनांत आहे. पण फॉस्टर मेला, झाला

साक्षी कोण ? माझें सांगणें कोण खरें मानील ? " शैवलिनी निजली. झोंपेंत देखील तिचे हेच विचार चालले होते. पहाटेच्या सुमारास तिला झोंप आली. झोंपेंत तिला दुष्ट स्वप्नें पडली. जेव्हां ती जागी झाली तेव्हां दिवस बराच वर आला होता. उघड्या गवाक्षांतून सूर्याचें ऊन घरांत पडलें होतें. डोळे उघडून समोर जें कांहीं तिनें पाहिलें त्यामुळें ती विस्मित, भयभीत व स्तंभित झाली. तिच्या समोर चंद्रशेखर उभा होता !





# चंद्रशेखर.

—:0:—

## तृतीयखंड.

## पुण्याचा स्पर्श.

### प्रथम परिच्छेद.

### रमानंद स्वामी.

मोंगीरांतील एका मठांत एक परमहंस फार दिवसांपासून रहात होता. त्याचें नांव रमानंद स्वामी. पूर्वीं सांगितलेला ब्रह्मचारी त्याजबरोबर मोठ्या विनीतभावानें कथोपकथन करीत असे. रमानंद स्वामी मोठा सिद्धपुरुष आहे असा पुष्कळांचा समज होता. तो मोठा अद्वितीय पुरुष होता खरा. भारतवर्षांतील लुप्तप्राय झालेलें दर्शनशास्त्र त्याला चांगलें अवगत आहे असा लोकांचा ग्रह होता. तो चंद्रशेखरास खालील उपदेश देत होता.

" वत्सा चंद्रशेखरा, ऐक. ज्या सर्व विद्या तूं शिकला आहेस त्यांचा चांगला उपयोग कर. संतापाला हृदयांत कधींही स्थान देऊं नकोस. कारण, दुःख ह्मणून स्वतंत्र पदार्थ नाहीं. सुख व दुःख समान आहे. व ज्ञान्याला तर दोन्हीं एकच आहेत. जर भेद मानला तर ज्यांना लोक पुण्यवान् व भाग्यवान् समजतात त्यांना चिरदुःखी ही संज्ञा द्यावी लागेल. "

असें सांगून रमानंदानें प्रथम ययाति, हरिश्चन्द्र, दशरथ वगैरे प्राचीन राजांचे दृष्टांत दिले. तसेंच श्रीरामचंद्र, युधिष्ठिर, नलराजा वगैरेंचाही उल्लेख केला, व असा सिद्धांत काढिला कीं, एवढे सार्वभौम व पुण्यात्मे राजे चिरदुःखी व किंचित् सुखी. नंतर वसिष्ठ विश्वामित्र वगैरेंचा उल्लेख करून तेही दुःखीच ठरविले. तीच अवस्था इंद्रचंद्रादि देवतांची. अखेरीस मनमोहिनी दैवी वाक्शक्तीचें आव्हान करून, अनंत अपरिज्ञेय अशा विधातृहृदयाचा विचार करून त्यानें असें सिद्ध करून दाखविलें कीं, सर्वज्ञ जो विधाता तो देखील ह्या दुःखमय अनंत संसारांत अनाद्यनंत काल अनंत दुःखराशी अनुभवित असावा. कारण जो दयामय आहे त्याला ह्या संसारांतील दुःखराशींच्या अनुभवानें दुःख होणार नाहीं काय? तसें नसेल तर तो दयामय कसा? कारण दुःख व दया ह्यांचा नित्य संबंध आहे. दुःखच जर नसेल तर दया कोठून येईल. जो मिळून दयामय त्याला अनंत संसारासंबंधीं अनंत काल दुःख झालेंच पाहिजे. तसें जर न होईल तर तो दयामयच नव्हे. कोणी ह्मणेल कीं, तो तर निर्विकार. त्याला दुःख कोठचें ? तर त्यावर असें उत्तर आहे कीं तो जर निर्विकार ह्मटला तर सृष्टिस्थितिसंहाराविषयीं तो उदासीन असला पाहिजे. आणि मग त्याला स्रष्टा, विधाता वगैरे विशेषणें देतां येणार नाहींत. व हीं जर देणें आहेत तर निर्विकार ह्मणतां येत नाहीं. आणि सविकार आहे तर दुःखमय असलाच पाहिजे. परंतु हेंही जुळत नाहीं. कारण तो नित्यानंदस्वरूप आहे. ह्यावरून असें सिद्ध होतें कीं, दुःख असें कांहीं नाहींच. ”

रमानंद स्वामी आणखी ह्मणाले “ व जर दुःख आहे असें धरून चाललें तर ह्या सर्वव्यापी दुःखाच्या निवारणाचा उपाय नाहीं का ? उपाय नसेल तर सर्वांनींच सर्वांचें दुःख निवारण्याविषयीं उद्युक्त राहिलें असतां दुःख निवारण अवश्य झालेंच पाहिजे. पहा बरें, विधाता आपण होऊन प्रतिदिवशीं सृष्टीचें दुःख निवारण करण्याविषयीं तत्पर आहे. आणि सृष्टीचें दुःख निवारण झालें ह्मणजे अर्थातच ऐहिक दुःखाची निवृत्ति झाली.

देवतागण जीवांचीं दुःखें निवारण्यास नियुक्त आहेत आणि त्यापासूनच त्यांची सुखप्राप्ति. एरव्हीं इंद्रियादि विकाररहित देवतांना दुसरें सुख कोठलें ? पुढें ऋषिगणांची परहितबुद्धि वर्णन करून नंतर भीष्मादि योद्ध्यांची परोपकारिता त्यानें सांगितली आणि असें ठरविलें कीं, जो कोणी परोपकारी तोच सुखी. दुसरा कोणी नाहीं. नंतर स्वामींनीं शेंकडों तऱ्हांनीं परोपकाराची महती आरंभिली. ते धर्मशास्त्र, वेद, पुराण, इतिहास इत्यादि ग्रंथांमधील प्रमाणांवर प्रमाणें देऊं लागले. नंतर शब्दसागर मंथन करून त्यांतून शंभर शंभर अर्थांचे प्रगल्भ आणि श्रवणमनोहर असे शब्द निवडून त्यांची कुसुममालावत् वाक्यपरंपरा गुंफूं लागले. साहित्य भांडार लुटून सारवती रसपूर्णा आणि सदलंकारविशिष्ट अशी कवितावलि निर्माण करूं लागले. आणि अखेरीस त्यांनीं आपल्या अकृत्रिम अशा धर्मश्रद्धेची मोहमयी प्रतिभायुक्त छाया पसरली. त्यांच्या त्या सुंदर कंठांतून निघालेली ती अपूर्व वाणी चंद्रशेखराच्या कानांत कर्ण्यासारखी घुमूं लागली, आणि तो विस्मित होऊन गेला. त्याच्या शरीरावर रोमांच उभे राहिले. नंतर त्यानें उठून रमानंद स्वामींची पायधूळ डोक्यावर घेतली आणि तो ह्मणाला " गुरुदेव, आज मी आपल्यापासून हा मंत्र घेतला. " आणि रमानंदस्वामींनीं चंद्रशेखरास आलिंगन दिलें.

---

## द्वितीय परिच्छेद.

---

### नूतन परिचय.

इकडे यथासमय ब्रह्मचाऱ्यानें दिलेलें पत्र नबाबाच्या हातीं गेलें. दलिनी कोठें आहे हें नबाबाला समजलें. तिला व कुलूसमला आणण्याकरितां त्यानें प्रतापाच्या बिऱ्हाडीं मेणा पाठविला.

मेणा गेला त्यावेळीं दिवस बुडाला होता. शैवलिनीशिवाय प्रतापाच्या घरीं त्यावेळीं कोणीही नव्हतें. तिला पाहून हीच बेगम असावी असा नबाबाच्या दूतांचा समज झाला.

आपल्याला किल्ल्यांत गेलें पाहिजे असें शैवलिनीला समजलें. अकस्मात् तिच्या मनांत एक युक्ति आली. कविजन आशेच्या प्रशंसनेनें मुग्ध होतात. आशा ही संसारांतील अनेक सुखांचें कारण आहे खरें, पण दुःखाचेंही मूळ आशाच आहे. प्राणिमात्राचे हातून जितकें पाप घडतें तितकें सर्व लाभाच्या आशेनें घडतें. केवळ सत्कार्य कोणत्याही आशेनें घडत नाहीं. स्वर्गप्राप्तीच्या आशेनें लोक जें सत्कार्य करितात त्याला सत्कार्य ह्मणतां येणार नाहीं. आशेनें मुग्ध होऊन शैवलिनी एकदम मेण्यांत बसली.

किल्ल्यांत आणल्यावर शैवलिनीला नबाबाच्या समोर नेलें. नबाबानें पाहिलें तों ती दलिनी नव्हे. पण ती दलिनीहूनही अधिक सुंदर आहे व तिच्या तोडीची सुंदर स्त्री आपल्या सर्व जनानखान्यांत एकही नाहीं असें त्याला कळून आलें. नबाबानें विचारिलें " तूं कोण ? "

**शैवलिनी**—मी ब्राह्मणकन्या.

**नबाब**—तूं कशाकरितां आलीस ?

**शैवलिनी**—आपले लोक मला घेऊन आले.

**नबाब**—तुला बेगम समजून ते घेऊन आले. पण बेगम कां आली नाहीं ?

**शैवलिनी**—ती तेथें नाहीं.

**नबाब**---तर मग ती आहे कोठें ?

गलष्टन् व जानसन यांनीं दलिनी व कुलसम यांना प्रतापाच्या घरांतून नेलें हें शैवलिनीनें पाहिलें होतें. त्या कोण होत्या तें तिला माहित नव्हतें. त्या कोणी दासी अगर कळवंतिणी असाव्या असें तिला वाटलें. पण जेव्हां नबाबाच्या दूतांनीं तिला सांगितलें कीं, दलिनीबेगम प्रतापाच्या घरीं होती व दलिनी समजून ते आपल्याला घेऊन आले, तेव्हां तिला समजलें कीं दलिनीला इंग्रजलोक घेऊन गेले. शैवलिनी विचार करीत स्वस्थ उभी राहिली.

शैवलिनी कांहीं बोलत नाहीं असें पाहून नबाबानें पुन्हां विचारिलें " तूं तिला पाहिलें आहेस काय ? "

**शैवलिनी**---हो.

**नबाब**---कोठें ?

**शैवलिनी**---जेथें मी काल रात्रीं होतें तेथें.

**नबाब**---तें कोठें ? प्रतापरायाच्या घरीं ?

**शैवलिनी**---होय सरकार.

**नबाब**---बेगम तेथून कोठें गेली हें तुला माहीत आहे ?

**शैवलिनी**---दोन इंग्रज तिला घेऊन गेले.

**नबाब**---काय ह्मटलेंस ?

शैवलिनीनें पुन्हां वर सांगितल्याप्रमाणें उत्तर दिलें. नबाब स्वस्थ बसून दांत ओठ खाऊं लागला. व त्यानें गुरगनखानास बोलावून आणण्यास सांगितलें. नंतर तो पुन्हां शैवलिनीला ह्मणाला " इंग्रज दलिनीला कां घेऊन गेले तें तुला माहीत आहे ? "

**शैवलिनी**---नाहीं.

**नबाब**---प्रताप त्यावेळीं कोठें होता ?

**शैवलिनी**---त्यालाही ते तिच्या बरोबरच घेऊन गेले.

**नबाब**---त्याच्या घरीं आणखी कोण होतें ?

शैवलिनी—एक नोकर होता, त्याला देखील ते घेऊन गेले.

नबाबानें पुन्हां विचारिलें "त्यांना कां घेऊन गेले हें तुला माहीत आहे ?"

आतांपर्यंत शैवलिनीनें सर्व खरी हकीकत सांगितली. पण पुढें मात्र तिनें खोटें सांगण्यास आरंभ केला आणि ती ह्मणाली " नाहीं. "

नबाब—प्रताप कोणचा ? त्याचें घर कोठें आहे ?

शैवलिनीनें प्रतापाची सर्व इत्थंभूत हकीकत सांगितली.

नबाब—तो येथें कशाकरितां आला होता ?

शैवलिनी—सरकारांत नोकरी करावी ह्मणून.

नबाब— तो तुझा कोण ?

शैवलिनी— माझा पति.

नबाब— तुझें नांव काय ?

शैवलिनी— रूपसी.

शैवलिनीनें सहज वरील उत्तर दिलें. ती दुष्ट पापिष्ठा हीच गोष्ट सांगण्याकरितां येथें आली होती.

नबाब ह्मणाला " बरें, तूं आतां जा. "

शैवलिनी— मला घर कोठें आहे ? मी जाऊं कोठें ?

नबाब क्षणैक गप्प बसला व नंतर ह्मणाला " तर मग तूं जाणार कोठें ? "

शैवलिनी— आपल्या पतीकडे. मला माझ्या पतीकडे पाठवा. आपण राजे, आपणापाशीं मी अर्ज करतें; माझ्या पतीला इंग्रजांनीं धरून नेलें आहे. आपल्याला वाटेल तर आपण माझ्या पतीची सुटका करा नाहींतर मला तरी तिकडे पोंचती करा. आपण जर ह्याचा कांहीं उपाय करीत नसाल तर मी आपल्या समोर जीव देतें. ह्मणूनच मी येथें आलें.

इतक्यांत गुरघनखान आल्याची बातमी आली. नबाब शैवलिनीला ह्मणाला " बरें तूं येथेंच ऐस, मी इतक्यांत येतों.

---

## तृतीय परिच्छेद.

### नूतन मित्र.

नबाबानें गुरगनखांला प्रथम इकडली तिकडली हकीकत विचारली आणि नंतर तो ह्मणाला " इंग्रजाबरोबर युद्ध करणें हेंच श्रेयस्कर आहे. माझी तर मसलत अशी आहे कीं, युद्धाला आरंभ करण्या पूर्वी आमिएटसाहेबाला अडकवून ठेवणें जरूर आहे; कारण आमिएट आमचा परम शत्रु आहे. तुझें ह्मणणें काय आहे ? "

गुरगनखां ह्मणाला " युद्धाला माझी सर्वदा तयारी आहे; परंतु वकिलाला ( आमिएटला ) अडकवून ठेवणें योग्य नाहीं. आपण जर तसें कांहीं केलें तर लोक आपणांला विश्वासघातकी ह्मणतील आणि आपली निंदा करतील. शिवाय—"

**नबाब**—आमिएट साहेबानें काल रात्रीं शहरांत जाऊन एका गृहस्थाचे घरांत शिरून त्याला पकडून नेलें. जो कोणी माझ्या अमलाखालीं राहून अन्याय करील तो कोणीही असला तरी त्याला शिक्षा दिली पाहिजे.

**गुरगन**—त्यानें अपराध केला असेल तर त्याला दंड योग्यच आहे. पण त्याला पकडावयाचा कसा ?

**नबाब**—आतां त्याच्या बंगल्यावर शिपाई पाठवून त्याला त्याच्या लोकांसुद्धां पकडून आणावा.

**गुरगन**—हल्लीं ते या शहरीं नाहींत. आज दुपारीं ते येथून गेले.

**नबाब**—काय ? मला इतला दिल्याशिवाय गेले ?

**गुरगन**—इतला देण्याकरितां ' हे ' नामक एका साहेबाला त्यांनीं येथें ठेविलें आहे.

**नबाब**—पण अशा रीतीनें न कळवितां एकदम निघून जाण्याचें काम काय ? ह्या कृतीनें त्यांनीं माझें वैर संपादिलें हें त्यांना कळलेंच असेल.

**गुरगन**—त्यांच्या हत्यारांच्या नौकेवरील एका इंग्रजाचा काल रात्रीं कोणी खून केला असें आमिएटचें ह्मणणें आहे. ह्मणूनच तो रागावून निघून गेला. येथें राहणें मोठें धोक्याचें आहे असा त्याचा समज झाला.

**नबाब**—खून कोणी केला ह्याबद्दल कांहीं माहिती आहे का ?

**गुरगन**—प्रतापराय नामक एका मनुष्यानें.

**नबाब**—छान केलें. बरें, तो दृष्टीस पडल्यावर मग त्याचा विचार करूं. प्रतापराय आहे कोठें ?

**गुरगन**—त्या सगळ्यांना बांधून इंग्रजलोक घेऊन गेले. मग त्यांना त्यांनीं बरोबर नेलें कीं अजिमाबादेस पाठविलें तें माहीत नाहीं.

**नबाब**—आतांपर्यंत ही हकीकत मला कशी कळविली नाहीं ?

**गुरगन**—मला तरी आतांच समजली.

पण हें त्याचें सांगणें खोटें होतें. गुरगनखानाला सर्व हकीकत ठाऊक होती. त्याच्या मसलतीशिवाय आमिएटसाहेब मोंगीर सोडून जाताच ना. पण खोटें सांगण्यांत गुरगनखानाचे दोन उद्देश होते. एक, दलिनीला मोंगीरच्या बाहेर घालविणें; आणि दुसरा, आमिएटला आपल्या बाजूचा करून ठेवून पुढें मागें त्याच्या साहाय्यानें आपला कार्यभाग करून घेणें.

नबाबानें गुरगनखांची रवानगी केली. गुरगनखान जेव्हां जाऊं लागला तेव्हां नबाबानें मोठ्या रागानें त्याजकडे पाहिलें. त्या पाहण्याचा अर्थ इतकाच होता कीं " जोंपर्यंत युद्ध संपलें नाहीं तोंपर्यंत मी कांहीं बोलणार नाहीं. कारण, युद्धाच्या कामीं सर्व भिस्त काय ती तुझ्यावर. पण युद्ध आटोपल्यावर मग चांगला सूड घेईन. "

नंतर नबाबानें मीरमुनशीला बोलावून आणवून हुकुम दिला कीं, मुरशिदाबादेस महंमदतकीखानाच्या नांवानें पत्र लिहा कीं, आमिएटची नौका तेथें आली ह्मणजे ती अडकवून ठेवा व तिजवर असलेले सर्व बंदिवान मुक्त करून हुजुराकडे पाठवून द्या. लढाईचा प्रसंग न आणतां

हें काम मोठ्या कौशल्यानें व युक्तीनें झालें पाहिजे असें लिहा. हें पत्र एका जासुदाच्या हातीं खुषकीच्या मार्गे रवाना करा ह्मणजे नौका तेथें पोंहोचण्याच्या अगोदर जाईल.

नबाब पुन्हां अंतःपुरांत आला व त्यानें शैवालिनीला हांक मारिली. आणि तो ह्मणाला " ह्यावेळीं तुझ्या पतीची सुटका झाली नाहीं. इंग्रजलोक त्याला घेऊन कलकत्त्याकडे गेले आहेत. मुरशिदाबादेस मी हुकूम पाठविला आहे, बहुतकरून ते तेथेंच पकडले जातील. सध्यां तूं—"

शैवलिनी हात जोडून ह्मणाली, " महाराज, मी बोलतें ह्याची माफी असावी. आतां लोक पाठविले तर कार्यभाग होणार नाहीं का ? "

नबाब—इंग्रजांना धरणें हें थोड्या लोकांचें काम नाहीं. त्याकरितां पुष्कळ सशस्त्र लोक पाठविले पाजिजेत व त्याला मोठी नौका पाहिजे. शिवाय ती नौका जाईपर्यंत ते मुरशिदाबादेस पोंचतील आणि लढाईचाच प्रसंग आला असें पाहून ते कदाचित् बंदिवानांना ठार देखील मारतील. मुरशिदाबादेस माझे हुषार कामगार आहेत ते मोठ्या युक्तीनें त्यांना उद्यां धरतील.

आपल्या सौंदर्यानें आपलें मोठें काम झालें असें शैवलिनीस वाटलें. तिचें सुंदर स्वरूप पाहून नबाबानें तिचं सर्व सांगणें खरें मानलें व तिच्यावर अधिक दया करण्याचें मनांत आणिलें. नाहीं तर तिचें ह्मणणें कोण मानतो. थोडीशी फूस मिळतांच शैवलिनीनें पुन्हां हात जोडून विनंति केली " महाराज, मज अनाथावर आपण इतकी दया केली तर आपणांला आणखी एक प्रार्थना आहे. माझ्या पतीची सुटका सहज होण्यासारखी आहे. ते स्वतः मोठे शूर आहेत. त्यांच्या हातीं शस्त्र असतें तर इंग्रजलोक त्यांना कैद करूं शकते ना. आणि अजून जरी त्यांना शस्त्र मिळालें तरी ते आपली व आपल्या बरोबरच्या सर्व लोकांची सुटका सहज करून घेतील.

नबाब हांसला आणि ह्मणाला " इंग्रजांना देखील हें माहीत असेलच. पण इंग्रजांच्या नौकेवर जाऊन त्याच्या हातीं शस्त्र नेऊन देणार कोण ? "

शैवलिनी मान खालीं करून अगदीं अस्फुट अशा स्वरानें ह्मणाली " जर हुकुम होईल व नाव मिळेल तर मीच जातें. "

नबाब मोठ्यानें हासला. तें पाहून शैवलिनी ह्मणाली " महाराज, तें काम माझ्या हातून झालें नाहीं तर मी मरेन. त्याची कांहीं परवा नाहीं. पण जरकरतां झालें तर माझेंही काम होईल व आपलेंही होईल. "

शैवलिनीचें भाषण ऐकून नबाबाची खात्री झाली कीं, ही सामान्य स्त्री नाहीं. त्यानें विचार केला कीं, ही मेली तर मरो. मला काय त्याची परवा ? आणि जर हिला हिच्या कामांत यश मिळालें तर चांगलेंच. नाहीं तर महंमद तकीखान खास काम फत्ते करीलच. नंतर तो शैवलिनीस ह्मणाला " काय, तूं एकटी जाणार ? "

**शैवलिनी**—मी स्त्री, मला एकटीला जातां येणार नाहीं. आपण दया करून मजबरोबर एक दासी व एक शिपाई द्या.

नबाबानें थोडा विचार करून मसीरउद्दीन नामक एका विश्वासू, बलिष्ठ व साहसी खोजाला हाक मारिली. तो आला व त्यानें नबाबाला मुजरा केला. नबाब ह्मणाला " ह्या स्त्रीला व एका हिंदु दासीला बरोबर घे. व ही सांगेल तीं हत्यारें बरोबर घे. आणि एक जलद जाणारी नाव घेऊन आतांच्या आतां मुरशिदाबादेस जा. "

**मसीर**— महाराज, तेथें जाऊन काय करावयाचें ?

**नबाब**— ही स्त्री जें सांगेल तें कर. बेगमेप्रमाणें हिची आज्ञा पाळ आणि दलिनी बेगम जर कोठें दिसली तर तिला घेऊन ये.

नंतर त्या दोघांनीं नबाबाला मुजरा केला व त्याची परवानगी घेऊन निघालीं. खोजानें जसा मुजरा केला तें पाहून तसाच शैवलिनीनेंही जमिनीला हात लावून व मागें सरून मुजरा केला. तें पाहून नबाब हांसला.

ती जाऊं लागली तेव्हां नवाब ह्मणाला " माझें स्मरण राख. अर काांहीं संकटांत पडलीस तर मीरकासीमाकडे ये. "

शैवलिनीनें पुन्हां मुजरा केला. ती मनांत ह्मणाली " येणार नाहीं कशी ? जमलें तर रूपसीसह पतीला घेऊन आपल्या दरबारीं येईन. "

मसीरउद्दीनानें नाव व दासी तयार केली. व शैवलिनीच्या सांगण्याप्रमाणें बंदुक, गोळ्या, दारू, पिस्तुल, तरवार व सुरी बरोबर घेतलीं. आतां पुढें करावयाचें काय हें विचारण्याचें मसीरुद्दिनाचें धाडस झालें नाहीं. तो मनांत ह्मणाला " ही खरोखर दुसरी चांद सुलताना आहे. "

त्याच रात्रीं ती नांवेवर स्वार होऊन निघाली.

---

## चतुर्थ परिच्छेद.

### क्रंदन.

चांदणें पडलें होतें. गंगेच्या दोन्हीं तटाकीं विस्तीर्ण वाळवंटें होतीं. चंद्रकिरणांनीं वाळवंटें जास्तच शुभ्रवर्ण दिसत होतीं व गंगेच्या प्रवाहाला गाढ नीलिमच्छटा आली होती. गंगेचें जल घननील, तटावरील तरु घनश्याम व वर नीलरत्नखचित आकाश. अशावेळीं गंगेचा विस्तार पाहून मन चंचल होतें. नदी अनंत, वर कितीही दूर नजर फेंकली तरी नदीचा अंत लागत नाहीं. खालींही तीच अवस्था. व दोन्हीं तीरीं अनंत वालुकामय प्रदेश. तीरावर वृक्षश्रेणी अनंत. वर अनंत आकाश व त्यामध्यें अनंत तारका. अशा वेळीं कोण मनुष्य आपली गणना करील ? ( ह्मणजे आपलें महत्व मानील ) नदीच्या तीरीं असलेल्या अनंत वालुकामय प्रदेशांतील एका वालुकाकणाहून मनुष्याची थोरवी अधिक ती किती ?

गंगेच्या प्रवाहांत ह्यावेळीं चालत असलेल्या नावांच्या श्रेणींत एक

मोठा बजरा ( टुमदार व सुरेख नाव ) होता, व त्यांत शिपायांचा पहारा होता. बाहेर दोन चांगले जवान शिपाई खांद्यावर बंदुक ठेवून उभे होते. झगझगीत दिव्याच्या प्रकाशानें आंतल्या बाजूस असलेले मौल्यवान् बिछाने, तसबिरा, खुर्च्या व टेबलें वगैरे सामान जास्तच खुलत होतें. आंत कित्येक साहेब बसले होते. दोघेजण बुद्धिबळें खेळत होते. दोघेजण दारू पीत होते व वाचीत होते. एकजण वाद्य वाजवीत होता.

एकदम सर्व लोक घाबरले. त्या शांत व निःशब्द प्रदेशांत एकाएकीं गंभीर रोदनध्वनि ऐकूं आला.

आमिएट साहेब जानसनला शह देतां देतां ह्मणाला "आँ, हें काय ?"

जानसन ह्मणाला "प्यादमात झाली कीं काय ?"

रडण्याचा स्वर अधिक अधिक वाढत चालला. स्वर मोठा होता असें नाहीं. पण त्या अनंत व शांत वालुकामय प्रदेशांत तो मोठा भासला इतकेंच.

आमिएटनें खेळ सोडून दिला व बाहेर येऊन चारी दिशेकडे दूरवर नजर फेंकली; पण त्याला कोणी दिसलें नाहीं. जवळपास कोठें स्मशान भूमीही नव्हती. तो क्रंदनध्वनि वालुकामय प्रदेशांतून येत होता.

आमिएट नौकेंतून खालीं उतरला. आणि त्या ध्वनीच्या अनुरोधानें चालला. पुष्कळ दूर गेल्यावर त्या वाळूवर कोणी एक स्त्री एकटीच बसली आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें.

आमिएट जवळ गेला. त्याला बंगाली चांगलें येत नव्हतें. त्यानें "तूं कोण ? रडतेंस का ?" असे प्रश्न आपल्या धेडगुजरी भाषेंत विचारिले. त्या स्त्रीला त्याचा कांहींएक बोध न होऊन ती जास्त जास्त रडूं लागली.

आपल्या प्रश्नाचें कांहीं उत्तर मिळत नाहीं असें पाहून आमिएटनें माझ्या बरोबर चल असें हाताच्या खुणेनें तिला सुचविलें. स्त्री उठली व रडत रडत त्याच्या बरोबर निघाली. ही स्त्री दुसरी तिसरी कोणी नसून आपल्याला परिचित अशी पापिष्ट शैवालिनी होती.

---

## पंचम परिच्छेद.

### हास्य.

बजऱ्यांत येऊन आमिएट गलष्टनला ह्मणाला " ही स्त्री ह्या वाळवंटावर एकटी बसून रडत होती. मला हिची भाषा कळत नाहीं व हिला माझी भाषा कळत नाहीं. तूं हिची चौकशी कर."

गलष्टन बहुतेक आमिएटच्या तोडीचाच पंडित होता! पण बंगाली भाषेच्या प्राविण्याविषयीं त्याच्या मंडळींत त्याची मोठी ख्याति होती. गलष्टननें तिला विचारिलें " तूं कोण ? "

शैवलिनीनें उत्तर दिलें नाहीं. ती तशीच रडत होती.

गलष्टन—कां रडतें आहेस ?

तरीही शैवलिनी गप्पच. तिचें रडणें चालूच होतें.

गलष्टन—तुझें घर कोठें ?

शैवलिनी पूर्ववत्.

गलष्टन—तूं येथें कां आलीस ?

शैवलिनी आपली गप्पच.

गलष्टन हारला. कोणत्याच प्रश्नाला उत्तर मिळत नाहीं असें पाहून त्या साहेबांनीं तिला जाण्यास सांगितलें. ते काय ह्मणतात हें न समजून शैवलिनी तेथल्या तेथें हालचाल न करितां स्वस्थ उभी राहिली.

आमिएट ह्मणाला " हिला आमचें बोलणें समजत नाहीं आणि आह्माला हिचें बोलणें समजत नाहीं. हिच्या पोषाखावरून ही बंगालीण असावी असें वाटतें. एखाद्या बंगाल्याला बोलावून हिची चौकशी करावी."

साहेबांचे बबरची ह्मटले ह्मणजे बहुतेक सर्व बंगाली मुसलमान. आमिएटनें त्यांपैकीं एकाला हाक मारून तिची चौकशी करावयास सांगितलें.

बबरचीनें विचारिलें " रडतेस कां ? "

त्यावर शैवलिनी वेड्यासारखी हांसली. बबरची साहेबाला ह्मणाला " साहेब, ही वेडी आहे."

साहेब ह्मणाले " तिला विचार, तुला काय पाहिजे ? " बबरचीनें विचारिलें. शैवलिनी ह्मणाली " मला भूक लागली आहे. "

बबरचीनें तें साहेबांना समजाऊन सांगितलें. त्यावर आमिएट ह्मणाला " तिला कांहींतरी खावयास द्या. "

बबरची मोठ्या आनंदानें शैवलिनीला स्वैपाकाच्या नौकेंत घेऊन गेला. आनंदानें असें ह्मणण्याचें कारण शैवलिनी फार सुंदर होती. त्या नौकेंत गेल्यावर शैवलिनीनें कांहीं खाल्लें नाहीं. बबरची ह्मणाला " खा ना कांहींतरी. " शैवलिनी ह्मणाली " मी जातीची ब्राह्मण आहे. तुह्मी शिजविलेलें अन्न मला कसें चालेल ? "

बबरचीनें साहेबांकडे जाऊन त्यांला ही गोष्ट कळविली. आमिएट ह्मणाला " नौकेंत कोणी ब्राह्मण नाहीं का ?

बबरची ह्मणाला " एक शिपाई व एक कैदी असे दोघेजण ब्राह्मण आहेत. "

साहेब ह्मणाला " मग त्यांपैकीं कोणाकडून तरी हिला कांहीं खाण्यास देववा. "

बबरची शैवलिनीला घेऊन प्रथम शिपायाकडे गेला. शिपायाजवळ कांहीं शिलक नव्हतें. नंतर ज्या नौकेंत तो ब्राह्मण कैदी होता त्या नौकेंत तो तिला घेऊन गेला.

ब्राह्मण कैदी ह्मणजे प्रतापराय. तो एका लहानशा नावेंत होता. त्याच्या आजूबाजूस संत्र्यांचा पहारा होता. नावेंत अगदीं अंधार होता.

बबरची ह्मणाला " अहो ठाकूर " ( बंगाल्यांत ब्राह्मणांना ठाकूर ह्मणून हांक मारितात ) प्रताप ह्मणाला " का ? "

**बबरची**—तुमच्या भांड्यांत कांहीं भात शिलक आहे का ?

**प्रताप**— कां ?

**बबरची**—एक ब्राह्मणाची मुलगी उपाशी आहे. तिला द्यायला कांहीं आहे कां ?

प्रतापरायाजवळही कांहीं अन्न शिलक नव्हतें, पण तो तसें ह्मणाला नाहीं. तो ह्मणाला " हो, आहे. माझ्या हातांतल्या बेड्या काढावयास सांग. "

बबरचीनें प्रतापाच्या बिड्या काढावयास संत्र्याला सांगितलें. संत्री ह्मणाला " मला हुकूम पाहिजे. "

बबरची हुकूम आणण्यास गेला. दुसऱ्याकरितां इतकी दगदग कोण करणार ? शिवाय पीरबक्ष हा बड्यासाहेबाचा बबरची. कांहीं झालें तरी कोणावरही उपकार न करणारा. जगांत जितके लोक आहेत त्या सर्वांत इंग्रजांचे मुसलमान बबरची ह्मणजे नीच. पण वरील दगदग सोसण्यांत पीरबक्षाचा एक स्वार्थहेतु होता. तो हा कीं, एकदां ह्या स्त्रीचें खाणें पिणें झालें ह्मणजे तिला एकवेळ आपल्या बबरचीखान्यांत नेऊन तिच्याशीं थोडी थट्टामस्करी करावी. ह्मणूनच तो शैवलिनीकरितां इतकी दगदग व धांवपळ करीत होता. प्रतापाच्या नौकेंत शैवलिनी बाहेर उभी होती व पीरबक्ष हुकूम आणण्याकरितां साहेबाकडे गेला होता. शैवलिनी तोंडावर बुरखा घेऊन तशीच उभी राहिली.

सुंदर चेहेऱ्याला चोंहोकडे मान आहे. व विशेषतः तो सुंदर चेहेरा जर स्त्रीचा असला तर तें अमोघ अस्त्रच होय. ही स्त्री अति लावण्यवती असून वेडी आहे असें पाहून, आमिएटला तिची कींव आली. आणि त्यानें प्रतापाच्या बिड्या काढण्याची व शैवलिनीला प्रतापाच्या नावेंत जाऊं देण्याची परवानगी दिली.

बबरचीनें दिवा आणून दिला. संत्र्यानें प्रतापाची बिडी काढली. " तूं नौकेंत येऊं नकोस. " असें बबरचीस सांगून हातांत दिवा घेऊन प्रताप शैवलिनीसह आपल्या कोठडींत शिरला, व जसें कांहीं तिला वाढूं लागला.

बाहेर संत्री पहारा करीत होते. कोठडींत काय चाललें आहे तें त्यांना दिसत नव्हतें. शैवलिनी कोठडींत गेली आणि प्रतापापुढें उभी राहून तिनें आपला बुरखा काढिला.

प्रतापाला आश्चर्य वाटलें. त्यानें पाहिलें तों शैवलिनी ओंठ चावीत आहे, तिचें मुख आनंदानें पूर्ण आहे व तिचा चेहेरा स्थिर प्रतिज्ञेची साक्ष देत आहे. तें पाहून त्याला वाटलें कीं, ही खरोखर मोठी धाडसी आहे.

शैवलिनी अतिशय हळु आवाजानें ह्मणाली " हात धुवा. मी का भातासाठीं आलें आहे ? "

प्रतापानें हात धुतले. शैवलिनी अगदीं त्याच्या कानाशीं लागून ह्मणाली " आतांच तुह्मी पळा कसे. "

तशाच हळु स्वरानें प्रताप ह्मणाला " आधीं तूं जा. नाहीं तर संकटात पडशील. "

**शैवलिनी**—आतांच पळा लवकर. हातांत बिड्या पडल्यावर मग पळतां येणार नाहीं. आतांच पाण्यांत झांप टाका. वेळ लावूं नका. एक दिवस माझा बुद्धिवाद ऐका. मला वेडी ठरविली आहे. मी नदींत झांप टाकितें आणि मला काढण्याकरतां ह्मणून तुह्मी माझ्या पाठोपाठ उडी टाका.

असें बोलून शैवलिनी मोठ्या मोठ्यानें हांसत उठली आणि हांसत हांसतच ह्मणाली " मी भात खाणार नाहीं. " व रडत रडत बाहेर आली आणि " मला मुसलमानाचा भात खाऊं घातला, माझी जात गेली. आई गंगे, तूं तरी मला आपल्या पोटांत घे. " असें ह्मणत तिनें नावेंतून गंगाप्रवाहांत उडी टाकिली.

" काय झालें, काय झालें ? " असें ह्मणत प्रताप नौकेबाहेर आला. संन्यानें त्याला थांबविलें. " मूर्खा, ती स्त्री बुडून मरते आहे आणि तूं उभा राहून पाहतो आहेस " असें ह्मणून प्रतापानें संन्याला एक लाथ मारिली. लाथ लागतांच तो शिपाई नावेंतून खालीं पडला. तीरावर शिपाई जमले. " त्या स्त्रीला वांचवा " असें ह्मणून प्रतापानें दुसऱ्या बाजूनें नदींत उडी टाकिली. पोहण्याच्या कामांत मोठी प्रवीण अशी ती शैवलिनी पोहत पोहत नदीप्रवाहांत पुढें पुढें चालली व प्रताप तिच्या मागोमाग चालला.

" कैदी पळाला " अशी पाठीमागल्या संत्र्यानें ओरड केली व बंदूक वर करून त्यानें प्रतापावर नेम धरिला. प्रताप पोहत चाललाच होता.

प्रतापानें त्या संत्र्याला हांक मारून सांगितलें कीं " भिऊं नको, मी पळालों नाहीं. ह्या स्त्रीला बाहेर काढतों. आपल्या डोळ्यासमोर स्त्रीहत्या कशी होऊं देऊं ? तूंही हिंदूच आहेस. ब्रह्महत्या करण्याचा तुझा इरादा आहे वाटतें. "

शिपायानें बंदुक खालीं केली.

ह्यावेळीं शैवलिनी अगदीं अखेरच्या नावेजवळ पोंचली. ती नाव पाहतांच ती घाबरली. आपण ज्या नावेवर फॉष्टरबरोबर होतों तीच ही नांव असें तिला वाटलें.

थोडावेळ त्या नावेचें तिनें निरीक्षण केलें आणि पाहिलें तों आंतल्या बाजूजस एका पलंगावर एक साहेब पडला आहे असें तिच्या दृष्टीस पडलें. चंद्राचे स्वच्छ किरण त्याचे तोंडावर पडले होते त्यामुळें तो लॉरेन्स फॉष्टर आहे असें तिनें तात्काळ ओळखिलें व ती एकदम मोठ्यानें ओरडली.

लॉरेन्स फॉष्टरनें बाहेर पाहिलें तों शैवलिनी पोहत आहे. तो एकमद मोठ्यानें ह्मणाला " पकडो, पकडो, हमारी बिबी. " फॉष्टर ह्यावेळीं अगदीं रुग्ण व शक्तिहीन होऊन अंथरुणावर पडला होता.

फॉष्टरचा शब्द ऐकतांच चार पांच जणांनीं शैवलिनीला धरण्याकरितां नदींत उड्या टाकिल्या. प्रताप त्यावेळीं त्यांच्या फार पुढें होता. त्यांनीं प्रतापाला हाक मारून सांगितलें " पकडो, पकडो, फॉष्टर साहेब इनाम देगा. " प्रताप मनांत ह्मणाला " फॉष्टरला मीं एकवेळ इनाम दिलें आहे. आणखी त्याची इच्छा असेल तर आणखी एकवेळ देईन." व मोठ्यानें ह्मणाला " मी पकडतों, तुह्मी फिरा मागें.

त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून ते परत फिरले. पुढें असलेला

मनुष्य प्रताप होता हें फॉष्टरला समजलें नाहीं. फॉष्टरचें डोकें अद्या-पही ठिकाणीं नव्हतें.

---

## षष्ठ परिच्छेद.

### अगाध जलसंतरण.

तीं दोघें पोहत पोहत फार दूर गेलीं. अहाहा! काय सुंदर देखावा! अशा त्या अनंतदेशव्यापिनी, विशालहृदय, क्षुद्रवीचिमालिनी व नीलिमामयी नदीच्या प्रवाहांतून पोहत जात असतांना उपरिस्थित नील-सागर आकाशाकडे त्यांची दृष्टि गेली. प्रताप मनांत ह्मणाला " ह्या वर असलेल्या आकाशसागरांत मनुष्याची गति कां बरें नाहीं? काय पुण्य केलें ह्मणजे ह्या सागरांत संतरण करावयास सांपडेल? पृथ्वीवर वाहणाऱ्या नदींतलें संतरण काय यःकश्चित! जन्मल्यापासून ह्या दुष्ट कालसमुद्रांत मी पोहतों आहें. ह्या समुद्रांत उठणाऱ्या लाटा मला एका लाटेवरून दुसरीवर फेंकीत आहेत आणि त्या लाटांवर मी तृणाप्रमाणें हेलकावे खातों आहें. आतां कसलें पोहणें? " शैवलिनी मनांत ह्मणाली " ह्या जलाला अंत आहे आणि मी तर अनंत संसारसागरांत विहार करितें आहे. "

तुह्मी ग्राह्य करा अगर न करा. पण ही जडप्रकृति आपला स्वभाव सोडीत नाहीं. सौंदर्य कधीं छपून राहणार नाहीं. तुह्मी समुद्रांत उडी घाला अगर नका घालूं. जलाचें नीलिम सौंदर्य भंग होणार नाहीं कीं त्याच्या वीचिमालांना धक्का लागणार नाहीं. आकाशांतील तारे तसेच चमकत राहतील, तीरावरील वृक्ष डोलत राहतील व जलांतील चंद्रबिंब तसेंच राहील. काय हें जडप्रकृतीचें दौरात्म्य.

हें सर्व प्रतापाच्या दृष्टीनें होतें, शैवलिनीच्या नव्हे. नावेंत दृष्टीस पड-लेली ती रुग्ण व शक्तिहीन मूर्ति शैवलिनीच्या मनांत खेळत होती. चंद्रा-

तल्या बाहुलीप्रमाणें शैवलिनी पोहत होती. परंतु तिच्या चित्ताला शांति नव्हती. दोघेंही पोहण्यांत प्रवीण होतीं. पोहत असतांना प्रतापाच्या आनंदसागराला भरती येत होती.

प्रतापानें हाक मारिली " शैवलिनी—शै."

शैवलिनी चपापली. तिचें हृदय कंपित झालें. लहानपणीं प्रताप तिला " शै " अगर " सई " ह्या नांवानें हांक मारी. ह्यावेळींही त्यानें त्याच नांवानें हाक मारिली. पण किती दिवसांनीं ! संवत्सर हें कांहीं कालाचें माप नव्हें. तर वस्तूची प्राप्ति अगर अप्राप्ति हें कालाचें माप आहे. जितके दिवसांत तिनें तो शब्द ऐकिला नव्हता तो काल तिला मन्वंतराप्रमाणें भासला. तो शब्द ऐकतांच शैवलिनीनें एकदम डोळे मिटले आणि मनां तले मनांत चंद्र आणि तारांना साक्षी ठेविले. व डोळे मिटून ती ह्मणाली:—

" प्रताप, गंगेंत हा मेला चंद्राचा प्रकाश ह्यावेळीं कोठून आला ? "

प्रताप ह्मणाला " चंद्राचा ? नव्हे. सूर्य उगवला आहे शै. आतां भीति उरली नाहीं. आपला पाठलाग करीत कोणीही खास येत नाहीं. "

**शैवलिनी**—तर मग किनाऱ्यावर चला.

**प्रताप**—शै.

**शैवलिनी**—काय ?

**प्रताप**—आठवण आहे का ?

**शैवलिनी**—कसली ?

**प्रताप**—एके दिवशीं आपण असेंच पोहत होतों त्याची.

शैवलिनीनें उत्तर दिलें नाहीं. एक मोठें लांकूड वहात चाललें होतें तें तिनें धरिलें व ती प्रतापाला ह्मणाली " तुह्मीही धरा व थोडी विश्रांति घ्या. दोघांचा भार हें सहन करील. " प्रतापानें तें लांकूड धरिलें आणि तो ह्मणाला " आठवतें तुला, कीं तूं बुडूं शकली नाहींस व मी बुडालों तें. ?" शैवलिनी ह्मणाली " हो, आठवतें. " तुह्मी जर आज मला "शै'

ह्या नांवानें हांक न मारता, तर मी खास बुडालें असतें. कां मला तुह्मी त्या नावानें हांक मारिली ? "

**प्रताप**—मनांत आणिलें तर मी बुडेन हें तुला ठाऊक असेलच ?

शैवलिनी जरा घाबरली आणि ह्मणाली " प्रताप, चला आपण तीरावर जाऊं. "

**प्रताप**—मी नाहीं येत. आज मी मरणार.

प्रतापानें लांकूड सोडून दिलें.

**शैवलिनी**—असें का ?

**प्रताप**—थट्टा नव्हे, मी खास बुडणार—तुझा हात कर इकडे.

**शैवलिनी**—काय ह्मणणें आहे तुमचें ? जें सांगाल तें करीन.

**प्रताप**—शपथ घे, तर मी बाहेर निघतों.

**शैवलिनी**—कसली शपथ ?

शैवलिनीनेंही लांकूड सोडिलें. तिच्या दृष्टीला सर्व अंधार झाला. चंद्र नाहींसा झाला, तारा लोपल्या, त्या स्वच्छ नीलजलानें तिचें अंग भाजूं लागलें व हातांत तरवार घेऊन फॉष्टर समोर उभा आहे असा तिला भास झाला. शैवलिनी श्वास बंद करून ह्मणाली " कसली शपथ प्रताप ? "तीं दोघेंही तें लाकून सोडून देऊन पोहत होतीं.

**प्रताप**—ह्या गंगेच्या पवित्र प्रवाहांत.

**शैवलिनी**—मला गंगेचा पवित्रपणा कसला ?

**प्रताप**—तर धर्माला स्मरून सांग—

**शैवलिनी**—मला धर्म तरी कोठें आहे ?

**प्रताप**—तर माझी शपथ ?

**शैवलिनी**—जवळ या—हात करा इकडे.

प्रताप जवळ गेला आणि त्यानें फारा दिवसांनीं शैवलिनीचा हात धरिला. हात धरून पोहणें दोघांनाही अवघड जाऊं लागलें ह्मणून दोघांनींही पुन्हां लांकडाचा आधार घेतला.

शैवलिनी ह्मणाली " आतां जें कांहीं बोलेन तें शपथपूर्वक बोलेन."

प्रताप—माझी शपथ घे लवकर. नाहीं तर बुडतों. प्राण कोणाकरितां ? कोणत्या सुखाच्या आशेवर ह्या पापमय जीविताचा भार सहन करावयाचा ? ह्या चंद्राच्या प्रकाशांत व ह्या स्थिर गंगाप्रवाहांत जर त्या जीविताचा भार सोडून दिला तर ह्याहून अधिक सुख तें कोणतें ?

आकाशांत चंद्र प्रकाशत होता.

शैवलिनी— तुमच्या शपथ—काय ह्मणूं बोला ?

प्रताप— घे शपथ—माझ्या हातावर हात देऊन शपथ घे—माझ्या पापपुण्याची व जीवितमरणाची तूं दात्री आहेस.

शैवलिनी— तुमच्याच शपथ—तुह्मी जें सांगाल तें मला प्रमाण.

प्रतापानें शपथ घेण्याची भयंकर गोष्ट सांगितली. ती शपथ घेणें शैवलिनीला फार कठीण वाटलें. ती पाळणें तिला असाध्य व प्राणांतकर वाटलें. शैवलिनीच्यानें शपथ घेववेना. ती ह्मणाली " प्रताप, ह्या संसारांत मजप्रमाणें दुःखी कोण आहे ? "

प्रताप— मी.

शैवलिनी— तुह्माला ऐश्वर्य आहे, पराक्रम आहे, कीर्ति आहे, घरीं रूपसी स्त्री आहे. पण मला कोणी आहे का ?

प्रताप—कोणी नाहीं ? चल तर आपण दोघेंही बुडूं.

शैवलिनी थोडावेळ विचारांत मग्न झाली. नंतर मनाशीं ह्मणाली " मी मेलें तर काय परवा ? पण मजकरितां प्रतापानें काय ह्मणून मरावें ? " व मग मोठ्यानें ह्मणाली " चला तीरावर. "

प्रतापानें लांकडाचा आधार सोडिला व तो बुडाला. अद्यापही प्रतापाचा हात शैवलिनीच्या हातांत होताच. शैवलिनीनें तो हात ओढिला. प्रताप बाहेर आला.

शैवलिनी—मी शपथ घेतें. पण तुह्मीच विचार करून पहा कीं, माझें सर्वस्व तुह्मी नाहींसें करितां आहां. मला तुह्मी नको. पण तुमचा विचार माझ्या मनांतून जाणार कसा ?

प्रतापानें हात सोडिला. शैवलिनीनें पुन्हां धरिला. आणि ती अति गंभीर, स्पष्ट व बाष्परुद्ध कंठानें ह्मणाली "प्रताप, तुह्मी माझा हात बळकट धरा. मी शपथ घेतें कीं तुमचें जीवित, मरण, शुभाशुभ सर्व माझें हातीं. ऐका तुमचीच शपथ, आजपासून मी तुह्मांला विसरलें. आजपासून मीं आपल्या सर्व सुखाला जलांजलि दिला. आजपासून मी आपलें मन दाबून ठेवणार. आजपासून शैवलिनी तुह्माला मेली."

शैवलिनीनें प्रतापाचा हात सोडिला व लांकूडही सोडिलें.

प्रताप गद्गदस्वरानें ह्मणाला "चल तीरावर जाऊं."

दोघेंही तीरावर गेलीं व चालत चालत वांकणाजवळ पोंचलीं. तेथें नाव उभी होतीं त्यांत तीं बसलीं व त्यांनीं नाव हाकारली. रमानंद स्वामी आपल्याकडे लक्षपूर्वक पहात आहे हें त्या दोघांपैकीं कोणालाच समजलें नाहीं.

इकडे इंग्रजांच्या लोकांना वाटलें कीं कैदी पळाला. ह्मणून ते त्याचा पाठलाग करण्यास निघाले. पण तो लवकरच दिसेनासा झाला, सबब ते परत फिरले.

रूपसीबरोबरच्या मोकद्दम्याचा अर्ज पेश होण्याच्या पूर्वींच शैवलिनी मोकद्दमा हारली.



## सप्तम परिच्छेद.

### रामचरणाची सुटका.

प्रताप जरी पळून गेला तरी रामचरणाची सुटका सहज झाली. रामचरण इंग्रजांचे नौकेवर कैदी ह्मणून नव्हता. त्याच्याच गोळीनें पहारेवाला संत्री पडला व फॉष्टर जखमी झाला हें कोणासही माहीत नव्हतें. तो एक साधारण नोकर असें समजून आमिएट साहेबानें मोंगिराहून निघतांना त्याला सोडून दिलें व सांगितलें कीं " तुझा धनी मोठा बिलंदर आहे, त्याला आह्मी चांगली शिक्षा देऊं. पण तुझ्याशीं आह्मांला कांहीं कर्तव्य नाहीं, तुला वाटेल तिकडें तूं जा. " हें ऐकतांच रामचरण हात जोडून ह्मणाला " मी आपला एक खेडवळ गौळी आहे, मला कसें बोलावें काय बोलावें तें कळत नाहीं—माझ्यावर रागावूं नका—माझ्याशीं आपलें कांहीं नातें आहे कीं काय ? "

जवळ असलेल्या एका मनुष्यानें रामचरण काय ह्मणाला तें आमिएटला समजावून सांगितल्यावर त्यानें विचारलें " कां बरें ? "

**रामचरण**—नाहीं तर आपण माझी थट्टा कशी करितां ?

**आमिएट**—थट्टा कसली ?

**रामचरण**—माझा पाय मोडून वर इच्छा असेल तिकडे जा ह्मणून सांगतां मी काय तुमचा मेव्हणा बिव्हणा आहे कीं काय ? मी आपला गरीब गवळी, इंग्रजांच्या बहिणीशीं जर मी लग्न केलें तर माझी ज्यात नाहीं का जाणार ?

दुभाष्यानें रामचरणाचें ह्मणणें आमिएटला समजाऊन सांगितलें तरी त्याला कांहीं बोध झाला नाहीं. त्याला वाटलें, हा एतद्देशीय लोकांचा खुशामतीचा प्रकार असावा. नेटिव्ह लोक ज्याप्रमाणें " मा बाप " "भाईसाहेब" वगैरे शब्दांनीं इंग्रजांची खुशामत करितात तशाच प्रकारचा ह्याच्या बोलण्याचा भावार्थ असावा असें तो समजला. सांगण्याचें तात्पर्य

इतकेंच कीं, आमिएटला रामचरणाच्या बोलण्याचा राग आला नाहीं. त्यानें विचारलें " तुला काय पाहिजे ? "

रामचरण--माझा पाय दुरुस्त करून देण्याचा हुकुम व्हावा.

आमिएट हांसून ह्मणाला " बरें, तूं आमच्या बरोबर कांहीं दिवस रहा. आह्मी औषधोपचार करूं. "

रामचरणाची तीच इच्छा होती. प्रतापाला बंदिवान् करून घेऊन जात होते त्याजबरोबर असण्याची त्याची इच्छा होती, ह्मणून रामचरण आग्रहपूर्वक आमिएट बरोबर निघाला होता. पण कैदी ह्मणून नव्हे.

ज्या रात्रीं प्रताप पळून गेला त्याच रात्रीं कोणाला कांहीं न कळवितां रामचरणही मुकाट्यानें निघून गेला. जातेवेळीं त्यानें हळू हळू इंग्रजांना पुष्कळशा शिव्या दिल्या.

---

## अष्टम परिच्छेद.

### पर्वतावर.

सा र्‍या रात्रीं चंद्रप्रकाश मुळींच पडला नाहीं. ढगांनीं चंद्र, तारे, नीहारिका ( nebulea ) वगैरे सर्व झांकून टाकिलें होतें. अनंतविस्तारी ढग पाण्यानें पूर्ण असल्यामुळें काळेभोर दिसत होते व त्यामुळें सर्व प्रदेश काळोखमय झाला होता. अशा ह्या काळोख्या रात्रीं शैवलिनी एका पर्वताजवळच्या प्रदेशांत एकटी बसली होती.

पाठलाग करीत येणाऱ्या इंग्रजांच्या शिपायांना फार मागें टाकून ती नाव त्यांनीं किनाऱ्यावर एका अडोशाच्या ठिकाणीं लाविली. ( मोठ्या नदीच्या तीरीं अशा अडोशाच्या जागा पुष्कळ असतात ) नाव तीरावर पोंचल्यावर थोड्या वेळानें शैवलिनी नावेंतून मुकाट्यानें उतरून निघून गेली. ह्या वेळीं ती कोणत्याही वाईट हेतूनें गेली नाहीं. वणवा लागलेल्या रानांतून

ज्या भीतीनें श्वापदें पळतात त्याच भीतीनें शैवलिनी प्रतापापासून पळून गेली. प्राणाच्या भीतीनें शैवलिनी सौंदर्य, सुख व प्रणय यांनीं परिपूर्ण अशा संसारापासून दूर झाली. सुख, सौंदर्य, प्रणय व प्रताप ह्या सर्वांचा न जाणो, कदाचित् जवळ राहिल्यानें मोह पडेल असें समजून ती त्या सर्वांपासून दूर झाली. मारवाडांत राहणाऱ्या एखाद्या श्रांत पथिकाच्या दृष्टीस जर अकस्मात् एखादा शीतल व स्वच्छ झरा पडला तर त्यांतील पाणी प्याल्याशिवाय त्याच्यानें राहवेल काय ? व्हिक्टरह्यूगो ह्यानें आपल्या ग्रंथांत ज्या समुद्रतलवासी बहुभुज राक्षसाचें वर्णन केलें आहे त्या मासल्याचेच लोभ आणि महत्वाकांक्षा हे मनुष्याचे ठिकाणीं स्वभावसिद्ध राक्षसच आहेत. हे स्फटिकाप्रमाणें पांढऱ्या शुभ्र जलांत वास करितात. ह्यांच्या निवासस्थानांत पुष्कळ महामौल्यवान् रत्नप्रवालादि रत्नें असतात. पण हे मनुष्याचें रक्त पान करतात. जे कोणी ह्यांच्या गृहाच्या सौंदर्याला भुलून आंत प्रवेश करितात त्यांना हे शतबाहु राक्षस आपला एक एक हात पसरून धरितात व एकदां त्यांनीं धरिलें ह्मणजे पुन्हां सुटण्याची आशा नको. नंतर ते राक्षस आपलीं शोणितशोषक सहस्र मुखें मनुष्याच्या शरिरावर ठेवून त्यांतील सर्व शोणित शोषून घेतात.

युद्धांत आपला टिकाव लागणार नाहीं असें पाहून शैवलिनी पळून गेली. मी पळून गेलें हें प्रतापाला कळतांच तो माझा शोध करण्यास येईल ही भीति तिच्या मनांत होती, ह्मणून जवळपास कोठेंही न थांबतां तिच्यानें जाववलें तितकी ती दूर गेली. सर्व भारतवर्षाला कटिबंधस्वरूप होऊन राहिलेली पर्वतश्रेणि जवळच तिच्या नजरेस पडली. पर्वतावर चढलें तर आपला पाठलाग करीत येणाऱ्याच्या आपण दृष्टीस पडूं असें जाणून ती दिवसा पर्वतावर चढली नाहीं. तेथें रानांतच दडून राहिली. सर्व दिवसांत तिनें कांहीं आहार केला नाहीं. पुढें रात्र पडली. रात्र कृष्णपक्षाची असल्यानें सायान्हीं काळोख होता. त्या काळोखांत शैवलिनीनें पर्वत चढण्यास आरंभ केला. काळोखांतून चालत असल्यामुळें दगडाच्या कप-

ऱ्या पायास रुतून त्यांतून रक्त वाहूं लागले. डोंगरावर चोंहोकडे वेली पसरल्या असल्यामुळें तिला मार्ग मिळेना. कांटेरी झाडांचे व वेलींचे कांटे आंगाला लागून तिच्या आंगांतून रक्त निघालें. शैवलिनीच्या पापाच्या प्रायश्चितास आरंभ झाला.

वरील विपत्तींचें शैवलिनीला कांहीं वाटलें नाहीं. तिनें आपल्या इच्छेनेंच पापाचें प्रायश्चित घेण्याचें ठरवून व सुखमय संसाराचा त्याग करून त्या भयंकर, कंटकमय व हिंस्र श्वापदांनीं युक्त अशा वनांत प्रवेश केला. आजपर्यंत ती घोरतर पापांत निमग्न होती. ह्या पुढें विपत्ति व क्लेश भोगून त्या पापाचें प्रायश्चित्त घ्यावयाचें असें तिच्या मनानें घेतलें.

ह्मणूनच पायांतून रक्त वाहतें आहे, शरीर रक्तानें भरलें आहे, भुकेनें व तहानेनें व्याकुळ झाली आहे अशा स्थितींत शैवलिनी पर्वत चढूं लागली. रस्ता दिसेना. लताकुंजांमुळें व दगडांच्या राशींमुळें दिवसा देखील रस्ता दिसण्याची मारामार. मग आतां तर पूर्ण कालोख होता. ह्मणून फार कष्टानें शैवलिनी थोडासा डोंगर चढून गेली.

अशावेळीं मेघ जलपूर्ण होऊन काळेकभिन्न दिसूं लागले. काळोखावर काळोख पडून, पर्वतप्रदेश, भोंवतालची वनराजी व दूर वहात असलेली नदी अंधकारानें झांकून गेली. सर्व जग काळोखमय झालें. जगांत पाषाण, कंटक व अंधकार ह्यांशिवाय दुसरें कांहीं नाहीं असें शैवलिनीला वाटूं लागलें. शेवटीं पर्वत चढून जाण्याचा प्रयत्न आतां व्यर्थ आहे असें वाटून ती हताश झाली व तेथेंच बसली.

आकाशाच्या मध्यापासून सीमान्तापर्यंत व सीमांतापासून मध्यापर्यंत विजा लखलखूं लागल्या. अतिभयंकर प्रसंग ! मध्यें मध्यें भीषण मेघगर्जना होऊं लागल्या. शैवलिनीला वाटलें कीं आतां मोठी वावटळही सुटेल व पर्वतावरील अनेक वृक्ष, शाखा, पानें, फुलें वगैरे सर्व स्थानच्युत होऊन नाश पावतील. पण माझ्या कपाळीं तें सुख कोठलें ?

एकदम अंगाला हें थंड काय लागलें ! पर्जन्याचा थेंब. पावसाचे थेंब

पडूं लागले. त्यावर दिगंतव्यापी गर्जन. तें गर्जन वृष्टि, वायू व मेघ यांचें होतें. त्याजबरोबरच कोठें वृक्ष मोडल्याचा आवाज, कोठें भीत पशूंचा आवाज, कोठें घडघडत जाणाऱ्या पाषाणांचा आवाजही निघत होता. तेथून दूर अंतरावर असलेल्या खवळलेल्या गंगेच्या लाटांच्या आवाजाचीही त्यांत भर पडत होती. शैवलिनी मान खालीं घालून पर्वतावरील एका दगडावर बसली होती. तिच्या डोक्यावर वृष्टि होत होती. वायूच्या योगानें हलणाऱ्या फांद्यांचे तिला भराभर तडाके बसत होते व वरून वहात येणारा पाण्याचा प्रवाह तिला कमरेपर्यंत स्नान घालीत होता.

हे जड प्रकृते, तुला शतवार प्रणाम असोत. तुला दया नाहीं, माया नाहीं, स्नेह नाहीं, जीवांचा प्राणनाश करण्याचा संकोच नाहीं. तूं अखिल क्लेशांची जननी. पण तुझ्याचमुळें सर्व वस्तूंची प्राप्ति. तूं सर्व सुखांची खाण. सर्व मंगलमयी, सर्वार्थसाधिका, सर्वकामनापूर्णकारिणी व सर्वांगसुंदरी. तुला नमस्कार असो. हे महाभयंकरी नानारूपरंगिनि, तूं ललाटीं चंद्राचा तिलक व मस्तकीं नक्षत्रांचा किरीट धारण करून ह्या अखिल विश्वाला मोह पाडला आहेस. तूं सर्व नाशिनी. लोकांचे प्राण घेण्यांत तुला कां आनंद वाटतो तें मला कळत नाहीं. तुला बुद्धि नाहीं, ज्ञान नाहीं, चेतना नाहीं. पण तूं सर्वमयी, सर्वकर्त्री, सर्वनाशिनी व सर्वशक्तिमयी आहेस. तूं ईश्वरी माया, ईश्वरी कीर्ति व अजेय आहेस. तुला कोटि कोटि प्रणाम असोत.

पुष्कळ वेळ गेल्यावर वृष्टि थांबली. पण वादळ थांबलें नाहीं. ते थोडें मंद मात्र झालें. पुढें गाढ अंधार पडला. ह्यावेळीं पर्वत चढणें किंवा उतरणें हीं दोन्हींही केवळ असाध्य आहेत हें शैवलिनीला कळून आलें. तीं तेथेंच थंडीनें कुडकुडत बसली. तिला वेदग्रामाची आठवण झाली व पुन्हां एकवार आपल्या घराचें दर्शन होऊन जर आपल्याला मरण येईल तर आपण सुखानें मरूं असें तिच्या मनांत आलें. घर दृष्टीस पडण्याची

गोष्ट दूरच राहिली पण उद्यां उगवणारा सूर्य तरी दृष्टीस पडतो कीं नाहीं कोण जाणें. वारंवार ज्या मृत्यूला ती बोलावीत होती तो आज तिच्या अगदीं संनिध होता. अशा त्या घोर समयीं त्या मनुष्यशून्य पर्वतावर त्या अगम्य वनांत त्या महाघोर अंधकारांत कोणी एका मनुष्यानें शैवलिनीच्या अंगावर हात टाकिला.

तो कोणा वन्य पशूचा स्पर्श असावा असा प्रथम शैवलिनीला भास झाला. ती जरा दूर सरली. पण पुन्हां तिला तो मनुष्यहस्ताचा स्पर्श झाला. अंधकार असल्यानें तो कोणाचा हात आहे हें तिला कांहीं दिसेना. शैवलिनी फार घाबरली आणि ह्मणाली " तुह्मी कोण? देव कीं मनुष्य ? " मनुष्यापासून शैवलिनीला भीति नाहीं पण देवापासून आहे. कारण देव दंडविधाता आहे. "

तिला कांहीं उत्तर मिळालें नाहीं. पण मनुष्य असो कीं देव असो, आपल्याला कोणी दोन्हीं हातांनीं धरीत आहे असें तिला समजलें. तिच्या खांद्यावर उष्णनिश्वास पडला. तिनें पाहिलें तों त्या मनुष्यानें तिच्या पाठीवर एक हात ठेविला व दुसऱ्या हातानें तिचे दोन्ही पाय धरून तिला उचलिलें. शैवलिनीनें एक किंचाळी फोडिली. तिला समजून आलें कीं, आपल्याला कोणी हातावर ठेऊन घेऊन जात आहे. थोडा वेळ गेल्यावर तिला भास झाला कीं, आपल्याला खांद्यावर बसवून कोणी पर्वतावर घेऊन जात आहे. शैवलिनीनें विचार केला कीं, हा कोणीही असो; लॉरेन्स फॉष्टर मात्र खास नाहीं.



# चंद्रशेखर.

## चतुर्थखंड.

## प्रायश्चित्त.

### प्रथम परिच्छेद.

—:*:—

### प्रतापानें काय केलें ?

प्रताप जहागीरदार व प्रताप लुटारू. आह्मी ज्या वेळची हकीकत लिहीत आहों, त्या वेळीं विद्यमान असलेले बहुतेक जहागीरदार लुटारूच होते. डारविनचें ह्मणणें आहे कीं, मनुष्यजात ही वानराची तिसरी पिढी आहे. डारविनच्या ह्या ह्मणण्याचा जर कोणाला राग येत नसेल तर पूर्वजांचा वरील गुण उघड करून सांगितल्याबद्दल हल्लींचे जहागीरदार आमच्यावर रागावणार नाहींत. वास्तविक पाहतां लुटारूंच्या कुळांत जन्म घेणें हें कांहीं हीनत्व नव्हें. कारण, लुटारूंच्या कुळांत जन्मलेले पुष्कळ लोक मोठ्या योग्यतेस चढल्याचीं पुष्कळ उदाहरणें दाखवितां येतील. तैमूरलंग नामक लुटारूचे वंशज पृथ्वीमध्यें श्रेष्ठ पदवीस चढले होते. इंग्लंडामध्येंही ज्यांना आपल्या पूर्वजांचा मोठा अभिमान आहे त्यांचे पूर्वजही नॉर्मन अगर स्कँडीनेवीअन लुटारूच होते. प्राचीन भारतवर्षांत कुरुवंश मोठा श्रेष्ठ मानला होता. पण ते देखील लुटारूच. त्यांनीं विराटाच्या गाई पळवून नेल्या होत्या.

पूर्वीच्या महाशीरदारांच्या लुटारूपणांत व प्रतापाच्या लुटारूपणांत थोडा भेद होता. फक्त आपल्या संपत्तीचें रक्षण करण्याकरितां व बलिष्ठ शत्रूची खोड मोडण्याकरितां प्रताप लुटारू लोकांची मदत घेत असे. पण अन्यायानें दुसऱ्याचें वित्त हरण करण्याकरितां अगर गरिबांस त्रास देण्याकरितां कधींही घेत नसे. एवढेंच नव्हे तर दुर्बल व पीडित लोकांचें रक्षण करून परोपकार साधण्याकरितां तो शक्य तें करीत असे.

ज्या रात्रीं शैवलिनी नावेंतून पळाली ती रात्र उजाडल्यावर प्रताप जेव्हां झोपेंतून उठला, तेव्हां रामचरण आलेला पाहून त्याला मोठा आनंद झाला. पण शैवलिनी नाहीं असें पाहून त्याला वाईट वाटलें. बराच वेळ तिची वाट पाहून तो तिच्या शोधार्थ निघाला. गंगातीरावर शोध केला, पण व्यर्थ. तेव्हां फार वेळ झाला, शैवलिनी बुडून मेली असा त्यानें सिद्धांत ठरविला. शैवलिनीचें बुडून मरणें असंभवनीय नव्हतें.

" मीच शैवलिनीच्या मृत्यूचें कारण आहें " असें प्रथम प्रतापाच्या मनांत आलें. पण त्यानें पुन्हां मनाशींच विचार केला कीं " माझा काय त्यांत दोष ? अधर्माचरण माझ्या हातून होणें नाहीं. शैवलिनी ज्या कारणानें मेली त्याचा प्रतिकार करणें मजकडून शक्य नव्हतें. " एतावता ह्यांत आपल्याकडे कांहीं दोष नाहीं असा त्याच्या मनाचा निश्चय झाला. मग तो चंद्रशेखराला दोष देऊं लागला आणि म्हणाला " चंद्रशेखरानें तिच्याशीं कशाला लग्न केलें ? " नंतर रूपसीला दोष देऊन तो म्हणाला " शैवलिनीशीं माझें लग्न न होतां रूपसीबरोबर कां झालें ? " सुंदरीला त्यानें एक दोष दिला. तो हा कीं, जर ती शैवलिनीला आणण्याकरितां मला न पाठविती तर हा गंगेंत पडण्याचा प्रसंगही न येता व शैवलिनीही न मरती. अखेरीस त्यानें सर्व दोष लॉरेन्स फास्टरला दिला. त्यानें जर तिला घरांतून नेलीच नसती तर मग पुढील कोणताच प्रसंग येता ना. इंग्रजलोक जर बंगाल्यांत न येते तर शैवलिनी फॉस्टरच्या हातीं न पडती. म्हणून एकंदरीत तो इंग्रजांवरच फार संतापला. प्रतापानें

सिद्धांत केला कीं, फॉष्टरला धरून ठार मारून त्याला जाळून टाकला पाहिजे. नाहीं तर तो लवकरच बरा होईल. कारण शेण पडलें तर माती घेऊन उठणारच. दुसरा सिद्धांत त्यानें असा ठरविला कीं, इंग्रजांचा बंगाल्यांतून नायनाट केला पाहिजे. कारण, त्यांच्यामध्यें पुष्कळ फॉष्टर आहेत.

असा विचार करीत करीत प्रताप त्याच नावेंतून परत मोंगीरास गेला. प्रताप किल्ल्यांत शिरला. त्या ठिकाणीं इंग्रजाशीं युद्ध करण्याची मोठी तयारी चालली होती.

प्रतापाला मोठा आनंद झाला. नबाबाला इंग्रजांना हिंदुस्थानांतून हांकून देतां येणार नाहीं कीं काय ? व फाष्टर धरला जाणार नाहीं कीं काय ? असें त्याच्या मनांत आलें.

नंतर त्यानें पुन्हां मनाशीं विचार केला कीं, प्रत्येकानें आपआपल्या सामर्थ्याप्रमाणें ह्या कामीं नबाबाला साह्य केलें पाहिजे. माझ्या हातून कांहीं साह्य होणार नाहीं काय ? माझ्या हातून काय बरें होईल? मजजवळ सैन्य नाहीं फक्त लाठियाल व लुटारू लोक आहेत. माझ्या हातून जरी दुसरें काहीं काम झालें नाहीं तरी लुटीचें होईल; ज्या गावचे लोक इंग्रजांना मदत करतील त्या गांवाची मी लूट करीन. इंग्रजांचें सामानसुमान कोठें जात असलेलें माझ्या दृष्टीस पडलें तर तें लुटीन. अशानें देखील नबाबाला पुष्कळ मदत होईल. समरांगणांत जय मिळविणें हा शत्रुविनाशाचा सामान्य उपाय आहे. पण सैन्याच्या पिछाडीवर हल्ला व शत्रूला अन्नपाण्याची ददात पाडणें ह्या प्रधान गोष्टी आहेत. माझ्या कडून होईल तितका प्रयत्न मी करणार. बरें मी हें कां करणार? त्याला अनेक कारणें आहेत. पहिलें कारण, इंग्रजांनीं चंद्रशेखराचा सर्वनाश केला आहे. दुसरें, शैवलिनी मेली आहे; तिसरें, मला इंग्रजांनीं बंदिवान् केलें होतें; चौथें, माझ्या प्रमाणेंच इतरांनाही बंदिवान् केलें होतें व अजूनही करीत आहेत. पांचवें कारण हें आहे कीं, अशा रीतीनें मी नबाबाच्या उपयोगीं पडलों

तर दोन परगण्यांची जहागीर तरी मिळेल. ह्मणून मी हा उद्योग करणारच.

नंतर वजीराची खुशामत करून त्याच्या मार्फत प्रतापानें नबाबाची भेट घेतली. नबाबाबरोबर त्याचें काय भाषण झालें तें समजलें नाहीं. नबाबाची भेट घेतल्यावर तो स्वदेशीं निघून गेला.

पुष्कळ दिवसांनीं आपला नवरा खुशाल परत आलेला पाहून रूपसीला मोठा आनंद झाला. पण शैवलिनी मेली हें ऐकून तिला तितकेंच दुःख झालें. प्रताप आल्याचें ऐकून सुंदरी त्याच्या भेटीस आली. शैवलिनीच्या मृत्यूची बातमी ऐकून तिलाही फार दुःख झालें. पण ती ह्मणाली " जें व्हावयाचें तें झालें. पण आतां शैवलिनी सुखी झाली. वाचण्यापेक्षां मरणें हेंच तिला अधिक श्रेयस्कर होतें. "

सुंदरी व रूपसी ह्यांची भेट घेतल्यानंतर प्रताप पुन्हां घरांतून निघून गेला. लवकरच चोंहोकडे अशी वदंता उठली कीं मोंगीरापासून काटोया पर्यंतच्या मुलखांत जितके लुटारू व लाठियाल लोक आहेत ते सर्व प्रतापाच्या हुकमानें बंड करणार आहेत.

तें ऐकून गुरगनखांला मोठी काळजी पडली.



## द्वितीय परिच्छेद

### शैवलिनीनें काय केलें ?

महांधकारमय पर्वतगुहेंत शैवलिनी एका पाषाणावर निजली होती. मागें सांगितलेल्या पुरुषानें तिला तेथें आणून ठेविलें होतें. वादळ व वृष्टि थांबली होती. पण गुहेंत गाढ अंधार व सर्वत्र सामसुम होतें. तथापि वरून टिबकणाऱ्या पाण्याचे थेंब खालीं पडत होते त्याचा टपटप असा ध्वनि मधून मधून निघत होता. व शिवाय कोणी एक प्राणि—मग तो मनुष्य होता कीं पशु होता कोण जाणे ?—त्या गुहेंत श्वासोछ्वास सोडीत होता.

इतक्यांत शैवलिनी भ्याली. भय ? त्याचें नांव नको. मनुष्याच्या स्थिर बुद्धीला कांहीं मर्यादा आहे. शैवलिनी त्या मर्यादेच्या पार गेली होती. तिला भय वाटलें नाहीं.—कारण जीवित तिला असहनीय झालें होते व जीव जाईल तर बरा अशी तिची इच्छा होती. सुख, धर्म, जाति, कुल, व मान हीं सर्व गेलीं होतीं—जायचें राहिलें होतें काय ? तिला भय उरलें होतें कशाचें ?

शैवलिनीनें बालपणापासून ज्या आशेचें मोठ्या यत्नानें आपल्या हृदयांत संगोपन केलें होतें ती आशा तिनें केव्हांच सोडून दिली होती. ज्याकरितां तिनें सर्वस्वाचा त्याग केला त्या प्रतापाचा देखील तिनें ह्या वेळीं त्याग केला. तिचें चित्त अगदीं शक्तिहीन झालें होतें. त्यावर दोन दिवस अनशन, रस्त्याचे श्रम, पर्वत चढण्याचे श्रम, वादळ व पावसामुळें झालेला त्रास. तिचें शरीरही अगदीं क्षीण झालें होतें व तशांत हा दैवी तडाका ! ती अगदीं अचेतन होऊन अर्धवट झोंपेंत व अर्धवट जागी अशी त्या पाषाणावर पडली होती.

जेव्हां तिची शुद्धि पूर्ण नष्ट झाली तेव्हां तिला समोर एक अनंत विस्तृत नदी दिसूं लागली. त्या नदींत पाणी नव्हतें. पण दोही थडी

भरून रक्ताचा प्रवाह चालला होता. त्यामध्यें अस्थि, सडकीं प्रेतें, माणसांचीं शिरें वगैरे वहात होतीं. चर्ममांसवर्जित केवळ अस्थींचे सांपळे असे कांहीं मगर इतस्ततः संचार करून त्या शोणितनदींत तरंगणारीं प्रेतें यथास्थित भक्षण करित होते. ज्या पुरुषानें आपल्याला पर्वताच्या गुहेंत आणून ठेविलें त्यानेंच आपल्याला ह्या नदीतीरीं आणून बसविलें असें शैवलिनीला वाटलें. ज्या प्रदेशांत ती बसली होती त्या ठिकाणीं ऊन्ह नव्हतें, चांदणें नव्हतें, तारा नव्हत्या, मेघ नव्हते, उजेड नव्हता व अंधारही नव्हता. सर्व कांहीं दिसत होतें पण अस्पष्ट. रुधिराची नदी, सडकीं प्रेतें, प्रवाहांत वाहणारे सडके सांगाडे व केवळ अस्थिमय मगर हीं सर्व फार भयंकर दिसत होतीं. नदीतीरीं वाळू नव्हती. पण तिच्या ऐवजीं चोहोंकडे तीक्ष्ण कांचीचे कांठे पसरले होते. त्या महाकाय पुरुषानें तिला नदीतीरीं आणून बसविलें आणि नदी पार जाण्यास सांगितलें. पार जाण्याला तर मार्ग नव्हता. नौका नाहीं, सेतु नाहीं. त्या पुरुषानें सांगितलें कीं, पोहून जा. तुला पोहायला येतें आहे. प्रतापाबरोबर गंगेंत तूं पुष्कळ पोहली आहेस. ह्या नदींत शैवलिनी कसची पोहणार ? त्या महाकाय पुरुषानें आपल्या हातांतील वेताची छडी तिला मारण्याकरितां उभारली. शैवलिनीनें पाहिलें तों ती छडी ज्वलंत लोहनिर्मित. शैवलिनी अद्यापि उभीच आहे असें पाहून तो तिला छड्यांचे प्रहार करूं लागला. त्या प्रहारांनीं शैवलिनी जळूं लागली. प्रहार असह्य झाल्यामुळें शैवलिनीनें एकदम त्या नदींत झांप टाकिली. लागलीच ते अस्थिमय मगर तिला धरावयास आले, पण त्यांनीं धरिलें नाहीं. शैवलिनी पोहत चालली. रक्ताचे तुषार तिच्या तोंडांत शिरूं लागले. तो महाकाय पुरुष तिच्याबरोबर नदीवरून चालत जात होता. मध्यें मध्यें प्रवाहांतून वाहत जाणारीं प्रेतें शैवलिनीच्या अंगाला खेटून जाऊं लागलीं. अशा रीतीनें शैवलिनी दुसऱ्या तीरीं पोंचली. आणि कांठावर जाऊन इकडे तिकडे पाहून "रक्षण करा, रक्षण करा" असें म्हणून ओरडूं लागली. समोर

तिच्या दृष्टीस जें काय पडलें त्याला सीमा नाहीं, आकार नाहीं, वर्ण नाहीं व नांव नाहीं. तेथें उजेड अगदीं कमी होता पण तो इतका प्रखर होता कीं तो पाहतांच तिचे डोळे भाजूं लागले. विषानें जशी शरिराची आग होते तशी तिच्या डोळ्यांची आग होऊं लागली. पुवाची व रक्ताची घाण तिच्या नाकांत इतकी शिरली कीं, तिनें नाक दाबून ठेवलें होतें तरी उमळून येतें कीं काय असें तिला वाटूं लागलें. कानांत अति-कठोर, कर्कश व भयंकर शब्द शिरूं लागले. हृदयविदारक आर्त स्वर, पैशाचिक हास्य, पर्वतविदारण, अशनिपतन, शिलावर्षण, जलकल्लोल वगैरेंनीं तिचे कान बधिर झाले. समोरून मोठी गर्जना करीत येणाऱ्या भयंकर वाऱ्यानें तिचें शरीर होरपळूं लागलें. शैवलिनी ओरडूं लागली " प्राण जातो, रक्षण करा रक्षण करा. " नंतर एक अतिशय हिडिस व दुर्गंधियुक्त मोठा किडा तेथें येऊन तिच्या तोंडांत शिरूं लागला. " माझें रक्षण करा, ह्या नरकापासून मुक्त होण्याचा कांहीं उपाय नाहीं का ? " असें शैवलिनी मोठ्या मोठ्यानें ओरडूं लागली.

महाकाय पुरुष ह्मणाला " उपाय आहे. " स्वप्नामध्यें आपणच केलेल्या ओरडा ओरडीनें शैवलिनी जागी झाली. पण तिची भ्रांति गेली नाहीं. पाठीला दमड रुततच होता. भ्रांतिमुळें ती जागेपणींच ओरडून ह्मणाली " माझें कसें होईल ? ह्यांतून सुटका होण्याचा कांहीं उपाय नाहीं काय ? "

गुहेंतून गंभीर ध्वनि निघाला " आहे. "

हें काय ? शैवलिनी खरोखरीच नरकांत आहे कीं काय ? शैवलिनीनें विस्मित होऊन व घाबरून विचारिलें " कोणता उपाय ? "

गुहेंतून उत्तर आलें " द्वादशवार्षिक व्रत कर. "

ही काय देववाणी आहे कीं काय ? शैवलिनी घाबरून गेली आणि ह्मणाली " तें व्रत कोणतें ? मला कोण शिकवील ? "

उत्तर—मी शिकवीन.

शैवलिनी—तुह्मी कोण ?

**उत्तर**—व्रत ग्रहण कर.

**शैवलिनी**—काय करूं ?

**उत्तर**—तूं नेसलेली ही रेशमी साडी सोडून मी देतों तें वस्त्र नेस. तुझा हात पुढें कर.

शैवलिनीनें हात पुढें केला. तिच्या हातावर एक वस्त्र पडलें. ती तें वस्त्र नेसली आणि ह्मणाली "आणखी काय करूं ?

**उत्तर**—तुझें सासर कोठें आहे ?

**शैवलिनी**—वेदग्रामीं. तेथें गेलें पाहिजे कीं काय ?

**उत्तर**—हो. तेथें जाऊन गांवाच्या शिवेवर एक पर्णकुटी तयार कर.

**शैवलिनी**—पुढें ?

**उत्तर**—जमिनीवर निजलें पाहिजे.

**शैवलिनी**—पुढें ?

**उत्तर**—फलमूलांशिवाय दुसरा आहार करितां उपयोगीं नाहीं.

**शैवलिनी**—पुढें ?

**उत्तर**—केसांच्या जटा केल्या पाहिजेत.

**शैवलिनी**—पुढें ?

**उत्तर**—फक्त एकवेळ संध्याकाळीं भिक्षेकरितां गावांत गेलें पाहिजे. व भिक्षा मागतांना घरोघरीं आपल्या पापाचा उच्चार केला पाहिजे.

**शैवलिनी**—माझें पाप उच्चार करण्यासारखें नाहीं. दुसरा कांहीं प्रायश्चित्ताचा मार्ग नाहीं काय ?

**उत्तर**—आहे.

**शैवलिनी**—कोणता ?

**उत्तर**—मरण.

**शैवलिनी**—मी व्रत ग्रहण केलें. आपण कोण ?

शैवलिनीला कांहीं उत्तर मिळालें नाहीं. पुन्हां ती ह्मणाली "आपण कोणीही असा, मी चौकशी करीत नाहीं. आपणांला पर्वतावरील देव

समजून मी प्रणाम करितें. आणखी एका प्रश्नाचें आपण मला उत्तर द्या. माझे पति कोठें आहेत ? ”

**उत्तर**—कां बरें ?

**शैवलिनी**—त्यांची माझी पुन्हां गांठ पडणार नाहीं काय ?

**उत्तर**—तुझ्या प्रायश्चित्ताची समाप्ति झाल्यानंतर होईल.

**शैवलिनी**—बारा वर्षांनंतर ?

**उत्तर**—हो.

**शैवलिनी**—आपण सांगितलेल्या प्रायश्चित्ताचा मार्ग स्वीकारिल्यावर मी वांचेन किती दिवस ? जर बारा वर्षें पूर्ण होण्याचे पूर्वींच मेलें तर ?

**उत्तर**—तर मरण्याचे वेळीं गांठ पडेल.

**शैवलिनी**—त्याच्या पूर्वीं गांठ पडण्याचा कांहींच मार्ग नाहीं का ? आपण देव, आपल्याला माहीत असेलच.

**उत्तर**—आतां त्याची गांठ घेण्याची इच्छा असेल तर सात दिवस रात्रंदिवस ह्या गुहेंत एकटें राहिलें पाहिजे. ह्या अहोरात्र सात दिवसांत दुसरा कांहीं एक विचार मनांत न आणितां पतीचें ध्यान केलें पाहिजे. ह्या सात दिवसांत रोज संध्याकाळीं फक्त एक वेळ गुहेबाहेर जाऊन फळेंमुळें खावीं; पण तीं देखील पोटभर खातां उपयोगीं नाहीं. कोणा मनुष्याजवळ जातां उपयोगीं नाहीं. आणि जर कदाचित् कोणाची गांठ पडलीच तर त्याशीं भाषण करतां कामा नये. जर ह्या अंधाऱ्या गुहेंत सात दिवस वास करून सरळ व अनन्यचित्तानें केवळ पतीचें ध्यान करशील तर त्याची गांठ पडेल.

## तृतीय परिच्छेद.

### काहूर उठलें.

शैवलिनीनें त्या पुरुषानें सांगितल्याप्रमाणें व्रत केलें. सात दिवस ती गुहेंतून बाहेर पडली नाहीं. फक्त एकदां सूर्यास्तानंतर फळें-मुळें सोधून आणण्याकरितां ती बाहेर जाई. सात दिवस तिनें कोणाही मनुष्याबरोबर भाषण केलें नाहीं. केवळ किंचित् आहार करून त्या घोर अंधकारमय गुहेंत ती अनन्यभावानें पतीचें ध्यान करीत राहिली. तिला इतर कशाचीही शुद्धबुद्ध नव्हती. तिच्या सर्व चित्तवृत्ति पतिपरायण झाल्या होत्या. त्या अंधकारांत तिला पतिमुखाशिवाय दुसरें कांहीं दिसत नव्हतें. त्या निःशब्द स्थळीं पतीच्या ज्ञानपरिपूर्ण व प्रेमप्रेरित वाक्यांशिवाय तिला दुसरें कांहीं ऐकूं येत नव्हतें. घ्राणेंद्रियाला पतिहस्तांतील पुष्पपात्रांतल्या पुष्पांच्या वासाशिवाय दुसरा वास येत नव्हता व त्वचेला केवळ चंद्रशेखराच्या सप्रेम प्रेमाचा स्पर्श होत होता. तिला दुसरी कोणतीच आशा नव्हती. फक्त पतिदर्शनाची मात्र होती. तिची स्मृति केवळ पतीच्या स्मश्रुशोभित व प्रशस्तललाटप्रमुख मुखमंडळाभोंवतीं घिरट्या घालूं लागली. ज्याप्रमाणें एखादी छिन्नपक्ष मधमाशी दुर्लभ सुगंधि पुष्पांच्या झाडाखालीं घिरट्या घालते त्याप्रमाणें तिची अवस्था झाली. ज्यानें तिला हें व्रत सांगितलें होतें तो मनुष्यप्राण्याचा पुरा माहितगार असला पाहिजे ह्यांत संदेह नाहीं. तो प्रदेश आधींच निर्जन, शांत, अंधकारमय व मनुष्यसंदर्शन विरहित. शिवाय शरीर क्षुत्पिपासापीडित, चित्त अन्यचिंता शून्य; अशावेळीं ज्या विषयाचें चिंतन करावें त्या विषयांत मन अगदीं तन्मय होतें. याप्रमाणें शरीर व मन हीं दोन्हीं पांगुळलीं आहेत व चित्त केवळ एकाग्र होऊन राहिलें आहे अशा अवस्थेंत तिचें एकदम स्थित्यंतर झालें.

स्थित्यंतर ? स्थित्यंर कसलें ? तिला दिव्यदृष्टि आली. नंतर ती

दिव्यदृष्टि तिनें अन्तर्वर्ति करून अंतरंगांत पाहिलें तों एक अप्रतिम रूप तिच्या दृष्टीस पडलें. त्याचें वर्णन काय करावें ! ते शालतरुप्रमाणें सरल दीर्घ बाहू, तो सुंदर बांधा, ती सुकुमार परंतु बळकट अशी देहयष्टि जी काय सौंदर्याची सीमाच , तसेंच तें प्रशस्त, चंदनचर्चित चिंतारेखांकित ललाट, जें काय जणुं सरस्वतीचें शय्यास्थान, इंद्राची रणभूमि, मदनाचा सुखकुंज व लक्ष्मीचें सिंहासन. असल्या दिव्य रूपापुढें प्रतापाचें रूप ह्मणजे सागरापुढें गंगा. आतां हे नयन. हे तेजाची जशी काय ज्वाळा टाकिताहेत, क्षणांत पहावें तों हंसताहेत, क्षणांत फिरताहेत, क्षणांत जलपूर्ण होताहेत, अशा दीर्घ, विस्फारित, तेजस्वी, स्थिर, स्नेहमय, करुणामय, किंचित् आरक्त व सर्वत्र तत्वजिज्ञासु नेत्रांपुढें प्रतापाच्या नेत्रांची काय प्रतिष्ठा ? कशी मला भूल पडली ? 'मी कसा आपला नाश करून घेतला ? कसा आत्मघात केला ? कोणीकडे हा सुंदर आणि कोमल परंतु सदृढ देह, जसा कांहीं नवपल्लवित शालतरु, माधवीलतायुक्त देवदारु, किंवा कुसुमाच्छादित पर्वत. ज्याचा एकार्ध सौंदर्य—एकार्ध शक्ति—एकार्ध चंद्र—एकार्ध भानु—एकार्ध गौरी—एकार्ध शंकर—एकार्ध राधा—एकार्ध कृष्ण—एकार्ध आशा—एकार्ध भय—एकार्ध ज्योति—एकार्ध छाया—एकार्ध वन्हि—एकार्ध धूम—अशा पुढें कशाचा प्रताप ? हें मीं कसें पाहिलें नाहीं ? कसा आपला नाश करून घेतला ? कसा आत्मघात केला ? तसेंच काय हें हास्य ! पुष्पपात्रस्थित मल्लिकाराशितुल्य, किंवा मेघमंडलस्थित विद्युत्तुल्य किंवा माझ्या सुखस्वप्नाप्रमाणें रमणीय हें मीं कसें पाहिलें नाहीं ? तसेंच हें समुद्राप्रमाणें अपार, अपरिमेय, अतुलस्पर्श, गंभीर, माधुर्यमय, अगम्य, अजेय, असें हें प्रेम मीं कसें ओळखिलें नाहीं आणि व्यर्थ आपला नाश करून घेतला. मी कोण ? मी काय त्यांच्या योग्य ? मी केवळ अज्ञान, अनक्षर पोर, त्यांचा महिमा जाणण्यास असमर्थ. त्यांच्यापुढें माझा काय पाड ? मी त्यांच्यापुढें जशी सागरांत शिंप, कुसुमांत कीट, चंद्रांत कलंक, अनुणांत कुणम,

हृदयांत विस्मृति, सुखांत विघ्न, आशेंत अविश्वास, सरोवरांत कर्दम, वन्हींत पतंग अशी आहे. त्यांच्यापुढें माझी काय योग्यता ? माझा घात झाला. मी मेलें कां नाहीं ?

ज्या पुरुषानें अशा रीतीनें पतीचें ध्यान करावयास सांगितलें तो खरोखर ह्या अनंत मानवहृदय समुद्रांतला नावाडी आहे. त्याला सर्व कांहीं माहीत आहे. ह्या मंत्रानें चिरप्रवाहित नदी आपला नेहेमींचा मार्ग सोडून दुसऱ्या मार्गानें वाहूं लागेल, ह्या मंत्ररूपवज्रानें पर्वत फुटतील, ह्या मंत्रानें वायूची देखील गति कुंठित होईल हें सर्व त्याला माहीत आहे. शैवलिनीच्या चित्तांतून चिरकाल वहात असलेल्या नदीचा ओघ फिरला, तिच्या चित्तांतील दुर्गम पर्वत भिन्न झाले व वायु स्तंभित झाला. शैवलिनीला प्रतापाची विस्मृति पडली व ती चंद्रशेखरावर प्रेम करूं लागली.

मनुष्याच्या इंद्रियांचा मार्ग रोध करा—मनाला आंवरून धरा—व त्याला बांधून एक मार्ग दाखवा—इतर मार्ग बंद करा व मनाची शक्ति नाहींशी करा—अशा स्थितींत मन काय करील ? त्या एकमार्गानें जाईल व तेथेंच स्थिर होईल. पांचव्या दिवशीं आणलेलीं फळेंमुळें शैवलिनीनें खाल्लीं नाहींत. सहाव्या दिवशीं ती फळेंमुळें आणण्यास गेली नाहीं. सातव्या दिवशीं सकाळीं तिनें विचार केला कीं, आज पतिदर्शन होवो अगर न होवो आज आपण मरणार. सातव्या दिवशीं रात्रीं आपल्या हृदयांत कमल विकसित झालें आहे व त्यावर चंद्रशेखर योगासन घालून बसला आहे व आपण भ्रमर होऊन त्याच्या पादपद्माशीं गुणगुण करीत आहों असा तिला भास झाला.

सातव्या दिवशीं रात्रीं त्या अंधकारमय गुहेमध्यें पतिध्यान करितां करितां शैवलिनीची चेतना नष्ट झाली. तिला नानातऱ्हेचीं स्वप्नें दिसूं लागलीं. एकदां आपण नरकांत बुडतों आहों; अगणित शतहस्तपरिमित सर्पगण आपल्या अयुत फणा पसरून आपणाला धरताहेत व आपणाला खाण्याचा प्रयत्न करताहेत, इतक्यांत चंद्रशेखर तेथें येऊन

एका सर्पाच्या फणेवर पाय देऊन उभा राहिला तोंच सर्व सर्प एकदम पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें सळ्कन् नाहींसे झाले, असा तिला भास झाला. एकदां असा भास झाला कीं, एका अनंत कुंडांत पर्वताकार अग्नि पेटला आहे, त्याच्या ज्वाला आकाशापर्यंत जाताहेत व आपण त्यामध्यें जळत आहों; इतक्यांत चंद्रशेखर तेथें येऊन त्यानें एक चुळकाभर पाणी त्या अग्निकुंडांत टाकतांच तो सर्व अग्नि विझून गेला. शीतल पवन वाहूं लागला. त्या कुंडामधून स्वच्छ पाण्याची नदी वाहूं लागली, तिच्या तीरीं अनेक फुलें विकसित झालीं, नदीप्रवाहांत मोठमोठीं कमलें प्रफुल्लित झालीं, चंद्रशेखर त्यावर उभा राहून प्रवाहांतून जाऊं लागला. एकदां असा भास झाला कीं, एक मोठा भयंकर व्याघ्र तेथें येऊन आपल्याला तोंडांत धरून पर्वतावर घेऊन जात आहे, इतक्यांत चंद्रशेखर तेथें येऊन त्यानें आपल्या पूजेच्या पुष्पपात्रांतलें एक पुष्प त्या वाघास मारतांच तो गतप्राण झाला. शैवलिनीनें पाहिलें तों तिला तें वाघाचें मुख फॉष्टरच्या मुखाप्रमाणें दिसलें.

रात्र संपतां संपतां तिला असा भास झाला कीं, आपण मेलों आहों पण ज्ञान बाकी आहे. पिशाचगण आपला देह घेऊन जात आहेत, कित्येक गगनवासी अप्सरा व किन्नर मेघमंडळांतून तोंडें बाहेर काढून आपल्याकडे पाहून हांसताहेत, कित्येक गगनसंचारी देव स्वर्ण मेघावर आरोहण करून व स्वर्णाप्रमाणें झगझगणाऱ्या विद्युन्माला परिधान करून इकडून तिकडे हिंडताहेत व आपल्या पापमय देहानें कलुषित झालेला वारा त्यांना लागतांच त्यांचें तेज नष्ट होऊन जात आहे. कित्येक गगनचारिणी भयंकर राक्षसी मेघांवर बसून भयंकर वावटळींत क्रीडा करिताहेत व आपला रक्तपूमिश्रित मृत देह पाहून त्यावर गिधाडाप्रमाणें झडप घालिताहेत. तसेंच कित्येक देव व देवी ह्यांच्या उज्वल विमानांच्या छाया मेघांवर पडताहेत, पण आपल्या विमानाची पुण्यमय छाया या पापिष्ट शैवलिनीवर पडली तर तिच्या पापाचें क्षालन होईल ह्या भयानें तीं विमानें दूर दूर नेत आहेत.

तारागण नीलांबरांतून आपलीं चिमुकलीं तोंडें बाहेर काढून किरणरूपी आपल्या अंगुलींनीं परस्परांस शैवलिनीचें प्रेत दाखविताहेत व म्हणताहेत " पहा भगिनीनो, मनुष्यप्राण्यांतली ही असती पहा. " कित्येक तारांच्या अंगावर रोमांच उभे राहून त्यांनीं आपले डोळे मिटले; कित्येकांनीं लज्जेनें आपलीं मुखें मेघमंडलांत झांकून घेतलीं; कित्येक तर असतीचें नांव ऐकतांच घाबरून मावळल्या ! पिशाचगण शैवलिनीचें प्रेत घेऊन आकाशमार्गें वर वर जाताहेत आणि अति उंच गेल्यावर तेथून तें प्रेत खालीं नरकांत टाकून देऊं असें म्हणताहेत. जेथें ते पोंचले तेथें अंधकार व थंडी. दुसरें कांहीं नाहीं. मेघ नाहींत, तारा नाहींत, प्रकाश नाहीं, वायु नाहीं व शब्दही नाहीं. शब्द नाहीं—परंतु अकस्मात् फार अंतरावरून खालून एक भयंकर घर घर शब्द ऐकूं येऊं लागला—जणूं काय अधोभागीं फार दूर अंतरावर हजारों समुद्र खवळून गर्जना करताहेत. पिशाचगण म्हणूं लागले " हा नरकाचा कोलाहल ऐकूं येऊं लागला, हा शव येथूनच खालीं फेंकून. " असें बोलत त्यांनीं शैवलिनीच्या मस्तकीं लाथ मारून तिचें प्रेत खालीं ढकलून दिलें. तें प्रेत गडबडत गडबडत खालीं जाऊं लागलें. पुढें गति वाढतां वाढतां अतिशय वाढली. प्रेताच्या मुखांतून व कानांतून रक्त वाहूं लागलें. क्रमाक्रमानें नरकाचा कोलाहल अधिक अधिक भीषण होत चालला. रक्तमांसाची घाण वाढत चालली व अकस्मात् संज्ञानष्ट शैवलिनीच्या दृष्टीस नरक पडला. त्या वेळीं तिचे चक्षु अंध झाले, कर्ण बधिर झाले व मनांतल्या मनांत ती चंद्रशेखराचें ध्यान करून म्हणूं लागली " प्रभु, तुम्ही कोठें आहां ? माझे जीवनसहाय, आराध्य दैवत व सर्व मंगलमय असे आपण कोठें आहां ? आपल्या चरणीं सहस्र सहस्र प्रणाम असोत. माझें रक्षण करा. आपल्याशीं मी निंद्य आचरण केल्यामुळें मी ह्या नरककुंडांत पडतें आहें. आपल्याशिवाय माझें रक्षण करणारें दुसरें कोणी नाहीं. माझें रक्षण करा, मजवर प्रसन्न व्हा व येथें येऊन आपली चरणधूलि माझ्या मस्तकीं ठेवा. असें कराल तरच माझा उद्धार होईल. "

त्यावेळीं अंध, बधिर व मृत शैवलिनीला असें भासूं लागलें कीं, आपल्याला कोणी मांडीवर घेतलें आहे. त्याच्या सुवासानें दिगंत भरून गेलें आहे. नरकाचा भयंकर कोलाहल नाहींसा झाला आहे व दुर्गंधीच्या ऐवजीं चोहोंकडे कुसुमगंध सुटला आहे. अकस्मात् शैवलिनीची बधिरता नष्ट झाली, डोळ्यांनीं दिसूं लागलें व तिला वाटलें कीं आपण मेलों नसून जिवंत आहों. आपण पहातों आहों हें स्वप्न नसून सत्य आहे. शैवलिनी पूर्ण शुद्धीवर आली.

तिनें डोळे उघडून पाहिलें तों गुहेमध्यें थोडा थोडा प्रकाश पडला होता व बाहेरल्या बाजूस पक्ष्यांचें प्रभातकूजन चाललें होतें. पण हें काय ? कोणाच्या मांडीवर तिचें डोकें टेकलें होतें ! कोणाचें मुखमंडल तिच्या मुखावर नवनोदित पूर्ण चंद्राप्रमाणें मंगलप्रकाश पाडीत होतें ! तिनें ओळखिलें तों ब्रह्मचारी वेषधारी चंद्रशेखर !

---

## चतुर्थ परिच्छेद.

### नौका बुडाली.

चंद्रशेखर ह्मणाला " शैवलिनी. "

शैवलिनी उठून बसली व तिनें चंद्रशेखराच्या मुखाकडे पाहिलें. तिचें डोकें फिरूं लागलें व ती पडली. तिचें तोंड चंद्रशेखराच्या पायावर पडलें. चंद्रशेखरानें तिला उचलून घेतलें व आपल्या मांडीवर बसविलें.

शैवलिनी रडूं लागली व मोठमोठ्यानें हुंबरडा फोडून पुन्हां चंद्रशेखराच्या पायावर लोळण घेऊन ह्मणाली " आतां माझी दशा काय होईल ? "

" तूं माझ्या भेटीची इच्छा कां केलीस ? "

शैवलिनीनें डोळे पुसले, रडणें आंवरलें व शांत होऊन ती ह्मणाली

" मी आतां फार दिवस वाचणार नाहीं. " शैवलिनी कांपूं लागली. स्वप्नांत पाहिलेल्या गोष्टी तिला आठवल्या. नंतर क्षणभर कपाळावर हात ठेवून ती स्तब्ध बसली आणि पुन्हां बोलूं लागली " मी आतां फार दिवस जगत नाहीं. मरण्यापूर्वीं एकवार आपलें दर्शन व्हावें अशी मनाला इच्छा झाली. माझें म्हणणें कोण खरें मानील ? माझ्या म्हणण्यावर कोण विश्वास ठेवील ? जिनें भ्रष्ट होऊन पतित्याग केला तिला पतिदर्शनाची इच्छा कोठून होणार ? "

शैवलिनी एकाएकी घाबरली व मोठ्यानें हांसली.

चंद्रशेखर--तुझ्या बोलण्यावर माझा अविश्वास नाहीं. तुला जबरीनें घेऊन गेले हें मला माहीत आहे.

शैवलिनी—ती खोटी गोष्ट. मी आपल्या खुषीनें फॉष्टरबरोबर निघून गेलें. घरावर दरवडा येण्याचे पूर्वींच फॉष्टरनें मजकडे लोक पाठविले होते.

चंद्रशेखरानें खालीं तोंड घातलें. त्यानें पुन्हां शैवलिनीला निजविलें आणि उठून जातां जातां म्हणाला " शैवलिनी, तूं बारा वर्षें प्रायश्चित्त भोग. तो काळपर्यंत आपण जर जगलों वांचलों तर पुन्हां गांठी पडतील. सध्यांची हीच आतां शेवटची भेट. "

शैवलिनीनें हात जोडिले व ती म्हणाली " आणखी थोडावेळ थांबा. मला वाटतें प्रायश्चित्त माझ्या दैवीं नाहीं " पुन्हां तिला स्वप्नाची आठवण झाली—" थांबा थोडावेळ मला तुम्हांला पोटभर पाहून घेऊं द्या. "

चंद्रशेखर बसला.

"आत्महत्येंत पातक आहे काय ?" असें विचारून शैवलिनीनें आपली स्थिर दृष्टि चंद्रशेखराकडे लाविली. तिचे डोळे पाण्यानें भरून आले.

चंद्रशेखर—आहे. आत्महत्या कां करतेस ?

शैवलिनीच्या अंगावर रोमांच उभे राहिले. ती म्हणाली " माझ्यानें मरवत नाहीं. मेलें तर त्या नरकांत पडेन. "

**चंद्रशेखर**—प्रायश्चित्त भोगल्यास नरक चुकेल.

**शैवलिनी**—पण ह्या मनोनरकापासून उद्धार होण्यास काय प्रायश्चित्त ?

**चंद्रशेखर**—हें काय ह्मणतेंस ?

**शैवलिनी**—ह्या पर्वतावर देवता येऊन बसल्या आहेत, त्यांनीं मला काय केलें आहे तें सांगतां येत नाहीं—मला रात्रंदिवस नरकाचीं स्वप्नें पडताहेत.

शैवलिनीची दृष्टि गुहेकडे लागून ती कांहीं न्याहाळून पहाते आहे, ग्लानी आलेलें तिचें मुखमंडल निस्तेज झालें आहे, नेत्र विस्फारित झाले आहेत, नाकांतून जोरानें श्वासोच्छ्वास चालला आहे व शरीर रोमांचित होऊन कापूं लागलें आहे असें चंद्रशेखराला दिसलें. त्यानें विचारिलें " काय पहातें आहेस ? "

शैवलिनीनें उत्तर दिलें नाहीं. ती पूर्ववत् पहातच राहिली. चंद्रशेखरानें पुन्हां विचारिलें " तुला कसली भीति वाटते आहे ? "

शैवलिनी पाषाणवत् स्तब्ध.

चंद्रशेखर विस्मित झाला. बराच वेळ तो तिच्या मुखाकडे पहात राहिला. त्याला कांहींच उमज पडेना. मोठ्यानें ओरडत शैवलिनी उठली व ह्मणाली " प्रभो, माझें रक्षण करा तुह्मी माझे पति ! तुह्मीं माझें रक्षण केलें नाहीं तर कोण करील. "

शैवलिनी मूर्च्छित होऊन जमिनीवर पडली.

चंद्रशेखरानें जवळच्या झऱ्याचें पाणी आणून तिच्या मुखावर शिंपडलें आणि आपल्या धोतरानें तिला तो वारा घालूं लागला. थोडा वेळ गेल्यावर शैवलिनी सावध होऊन उठून बसली व रडूं लागली.

**चंद्रशेखर**— काय पाहिलेंस ?

**शैवलिनी**— तोच नरक.

जिवंतपणींच शैवलिनीच्या कपाळीं नरकवास भोगणें आलें असें चंद्र-

शेखराला वाटलें. थोड्या वेळानें शैवलिनी ह्मणाली " मला मरायला धैर्य होत नाहीं. मला त्या भयंकर नरकाचें भय वाटतें. मी मेलें कीं नरकांत जाईन. मला जगलेंच पाहिजे. पण मी एकटी बारा वर्षें कशी वाचणार ? शुद्धींत व गैरशुद्धींत मला फक्त नरक दिसतो. "

चंद्रशेखर ह्मणाला " कांहीं चिंता नाहीं. उपवास व मानसिक श्रमांमुळें तुझी अशी अवस्था झाली आहे. वैद्यलोक ह्याला वायु असें ह्मणतात. तूं वेदग्रामीं जाऊन गांवाच्या शिंवेवर एक झोंपडी तयार करून रहा. तेथें सुंदरी तुजकडे येऊन तुझ्या रोगाची परीक्षा करून उपचार करील. "

एकदम शैवलिनीचे डोळे मिटले. तों गुहेच्या तोंडाशीं एक अंगुलि उचलून शिलेवर रेखल्यासारिखी सुंदरी उभी आहे अशी तिला दिसली. पाहते तों सुंदरी वाढत वाढत ताडाइतकी उंच वाढली. त्या गुहेंत एकदम नरक उत्पन्न झाला—ती रक्तमांसाची घाण, तें भयंकर अग्निगर्जन, तें शीत, तें सर्पारण्य, तो अमंगळ किड्यांचा घोळका, हीं सर्व तिला दृष्टिगोचर होऊं लागलीं. पुन्हां पाहते तों हातांत कंटकमय रज्जु व वृश्चिकविषनिर्मित वेत्रयष्टि घेऊन पिशाच त्या नरकांत उतरले—त्यांनीं रज्जूंनीं शैवलिनीला बांधिलें व त्या वेत्रयष्टीचे प्रहार करीत करीत ते तिला घेऊन चालले. तालवृक्षाप्रमाणें उंच वाढलेली ती सुंदरीची प्रस्तरमूर्ति हात वर करून त्यांना ह्मणाली " मारा, मारा, मी हिचें वारण केलें, नौकेंतून हिला परत आणण्याचा प्रयत्न केला, पण हिनें माझें ऐकिलें नाहीं. मारा, मारा, झोडपा यथास्थित. मी हिच्या पापाची साक्षी आहे. मारा, सोडूं नका. " शैवलिनी हात जोडून, गयावया करून, डोळ्यांत अश्रू आणून सुंदरीची प्रार्थना करते आहे, पण सुंदरी तिकडे लक्ष्य न देतां " मारा, मारा, ह्या पापिष्टेला यथास्थित मारा " असें ओरडून सांगते आहे. तें पाहून शैवलिनी तिजकडे दृष्टि लावून स्तब्ध राहिली. हें लक्षण कांहीं चांगलें नाहीं असें वाटून चंद्रशेखराला काळजी पडली आणि तो ह्मणाला " शैवलिनी, माझ्या बरोबर चल. "

प्रथम शैवलिनीनें तें ऐकिलें नाहीं. नंतर चंद्रशेखरानें तिच्या आंगावर दोन तीन वेळ हात फिरवून पुन्हां ह्मटलें "माझ्या बरोबर चाल."

शैवलिनी एकदम उठून उभी राहिली व अति घाबऱ्या आवाजानें ह्मणाली " चला, चला, लवकर चला, येथून लवकर चला. " व विलंब न लावितां व चंद्रशेखराची वाट न पाहतां ती गुहेच्या द्वाराकडे धांवत धांवत निघाली. धांवत चालल्यामुळें व गुहेंत अंधकार असल्यामुळें तिला एका दगडाची ठोकर लागून ती खालीं पडली व मूर्च्छित झाली.

नंतर चंद्रशेखरानें तिला कडेवर घेऊन, गुहेच्या बाहेर येऊन, जेथें एक पाण्याचा लहानसा प्रवाह वाहत होता तेथें आणिलें. तोंडावर पाणी शिंपडल्यानें व बाहेरचा थंड वारा अंगास लागल्यानें शैवलिनी शुद्धीवर आली आणि ह्मणाली " मी कोठें आलें ? "

चंद्रशेखर ह्मणाला, " मी तुला बाहेर आणिलें. "

शैवलिनीचें अंग कांपूं लागलें ती भ्याली आणि ह्मणाली. " तुह्मी कोण ? " चंद्रशेखरही घाबरला व ह्मणाला " असें काय करतें आहेस ? मी तुझा पति. मला ओळखिलें नाहींस काय ? "

शैवलिनी हा हा करून हासली व ह्मणाली:—

### पद्य.

( चंद्रकांत राजाची कन्या—या चा. )

॥ सुवर्ण वर्णी अलि जणु मत्पति पुष्पवनीं फिरतां ॥
॥ दुर्गम पंथें आले येथें मार्ग सुगम चुकतां ॥ १ ॥

ज्या दिव्य प्रभेच्या योगानें ह्या मनुष्यदेहाला इतकें सौंदर्य प्राप्त झालें आहे ती प्रभा शैवलिनीला सोडून जात आहे व तिच्या ऐवजीं तिच्या सुवर्ण तनुमध्यें विकट उन्माद शिरत आहे असें पाहून चंद्रशेखर रडूं लागला. त्यानें अति मृदु स्वरानें व मोठ्या आदरानें " शैवलिनी " अशी हांक मारिली.

शैवलिनी पुन्हां ही ही करून हांसली व ह्मणाली " शैवलिनी कोण ?

थांबा जरा. एक मुलगी होती तिचें नांव शैवलिनी व एक मुलगा होता त्याचें नांव प्रताप. एके दिवशीं रात्रीं तो मुलगा साप होऊन वनांत गेला व ती मुलगी बेडुक होऊन वनांत गेली. सापानें बेडकाला गिळून टाकलें. मी आपल्या डोळ्यांनीं पाहिलें. साहेब, तुह्मी लॉरेन्स फॉष्टर कीं काय ? ”

चंद्रशेखर गद्गद स्वरानें ह्मणाला “ गुरुदेव, हें काय झालें ? ही असें काय करते आहे ? ”

शैवलिनी गाणें गाऊं लागली व ह्मणाली:—

पद्य ( चाल सदर. )

॥ मनश्चोर हा माझा यानें स्वकरीं मज धरिलें ॥
॥ दुथडी भरल्या प्रीतिनदीमधिं नेउन वाहविलें ॥ १ ॥

“ मनश्चोर कोण ? चंद्रशेखर. धरिलें कोणाला ? चंद्रशेखराला. वाहवलें कोण ? चंद्रशेखर. दोन तीरें कोणतीं ? मला नाहीं ठाऊक. तुह्मी चंद्रशेखराला ओळखतां काय ? ”

चंद्रशेखर ह्मणाला “ मीच चंद्रशेखर. ”

शैवलिनीनें व्याघ्राप्रमाणें धांवत जाऊन चंद्रशेखराच्या गळ्याला मिठी मारिली व कांहीं न बोलतां ती रडूं लागली. तिनें आपल्या अश्रूंनीं त्याच्या सर्वांगाला स्नान घातलें. चंद्रशेखरही रडूं लागला. रडत रडत शैवलिनी ह्मणाली “ मी तुमच्याबरोबर येणार. ”

चंद्रशेखर ह्मणाला “ चल. ”

शैवलिनी ह्मणाली “ मला मारूं नका. ”

चंद्रशेखर ह्मणाला “ नाहीं. ”

दीर्घ निश्वास सोडून चंद्रशेखर उठला. शैवलिनीही उठली. मनांत कष्टी होऊन चंद्रशेखर चालूं लागला. अमिष्ट शैवलिनी त्याच्या मागोमाग निघाली. चालतां चालतां ती एकदां हंसे, एकदां रडे व एखादे वेळीं गात असे.



# चंद्रशेखर.

## पंचम खंड.

### प्रच्छादन.

### प्रथम परिच्छेद.

### आमिएटचा शेवट.

इंग्रजांच्या सर्व नौका मुर्शिदाबादेस येऊन पोंचल्या. आमिएट येऊन पोहोंचल्याची बातमी मीरकासिमाचा नायब महंमद तकीखानह्यास मिळाली.

महंमद तकीखानानें मोठ्या थाटानें येऊन आमिएटची गांठ घेतली. आमिएटला मोठा आनंद झाला. महंमद तकीखानानें आमिएटला खाण्याचें आमंत्रण दिलें. आमिएटनें त्याचा स्वीकार केला पण मनापासून नव्हे. इकडे महंमद तकीनें इंग्रजांच्या नौकेवर गुप्तपणें नजर ठेवण्याबद्दल आपल्या शिपायांस हुकुम दिला.

महंमद तकी निघून गेल्यावर इंग्रज अधिकारी आपसांत विचार करूं लागले कीं, निमंत्रणाप्रमाणें खान्यास जाणें योग्य आहे कीं अयोग्य आहे. गलस्टन व जॉनसन यांनीं असें मत दिलें कीं, भीति हा पदार्थ इंग्रजांना

माहीत नाहीं; तेव्हां जाणें हेंच योग्य. आमिएट ह्मणाला ज्याअर्थी आतां युद्धाचा प्रसंग खास आला आहे त्याअर्थी ह्यांच्याशीं आपला आहार व्यहारसंबंध राहिला कोठें ? तेव्हां निमंत्रणाप्रमाणें न जाणें हेंच योग्य.

इकडे ज्या नौकेंत दलिनी व कुलसम होत्या त्या नौकेंतही ही निमंत्रणाची बातमी पोंचली. दलिनी व कुलसम् ह्यांच्या कानगोष्टी सुरू झाल्या. दलिनी ह्मणाली " कुलसम, मला वाटतें आपली सुटका आतां लवकरच होईल. "

कुलसम—कशावरून ?

दलिनी—जसें कांहीं तुला कळतच नाहीं; अग, ज्यांनीं नबाबाच्या बेगमेला कैद करून आणिलें त्यांना जर मोठ्या सन्मानाचें निमंत्रण आलें आहे तर त्यांत कांहीं तरी गूढ हेतु असला पाहिजे. मला वाटतें इंग्रजांची शंभर वर्षें भरलीं.

कुलसम—त्याचा का तुह्मांला आनंद झाला आहे ?

दलिनी—कां बरें नाहीं होणार ? रक्तपात न होणें हें चांगलें. पण ज्यांनीं आह्मांला निरर्थक कैद करून आणिलें त्यांचा निःपात होऊन जर आपली सुटका होणार आहे तर आनंद कां बरें होणार नाहीं ?

कुलसम—पण सुटकेबद्दल इतकी उतावळी कां ? केवळ आपणांला अडकवून ठेवण्याशिवाय त्यांचा दुसरा कांहीं हेतु दिसत नाहीं. आपल्यावर कोणत्याही तऱ्हेची जबरदस्ती नाही. फक्त अटक. आपली पडनी खीजात. अटक ही आपल्या जन्मालाच लागली आहे.

दलिनी रागावून ह्मणाली " घरीं जरी अटक असली तरी मी नबाबाची बेगम. पण येथें इंग्रजांची दासी. तुझ्याशीं भाषण करण्याची माझी इच्छा नाहीं. आह्मांला कां अडकवून ठेविलें आहे तें तूं सांगशील ? "

कुलसम—त्यांत काय सांगावयाचें आहे. कोंगिरास हे साहेबास ज्याप्रमाणें इंग्रजांचा जामीन ह्मणून अडकवून ठेविलें आहे त्या प्रमाणेंच नबाबाकडच्या जामीन ह्मणून आपणांला अडकवून ठेविलें

आहे. हे साहेबाला सोडून देतांच आपलीही सुटका होईल. हे साहे-बाच्या जिवावर कांहीं संकट आलें कीं आपल्याही जिवावर येईल. नाहीं-तर भय कसलें ?

दलिनी अधिकच रागावली आणि ह्मणाली "मी तुझ्या हे साहेबाला जाणत नाहीं व तुझी इंग्रजांची स्तुतीही ऐकत नाहीं. सुटका झाली तर तूं जशी कांहीं जाणारच नाहींस वाटतें ?

कुलसम् न रागावतां हांसून ह्मणाली " जर मी मेलें नाहीं तर मला सोडून तुह्मी एकट्या जाणार आहां थोडयाच."

दलिनीचा राग वाढत चालला. ती ह्मणाली "मग आपण येथेंच रहावें अशी तुझी इच्छा आहे वाटतें ?"

कुलसम मोठ्या गंभीरपणानें ह्मणाली " दैवीं काय आहे हें कोणाला सांगतां येईल ?"

दलिनीनें भ्रुकुटी वक्र करून मोठ्या जोरानें आपली बद्धमुष्टि केली आणि कृष्णकेशांच्या गुच्छसंपर्कानें ज्या कानाला भ्रमर बसलेल्या कमला-ची शोभा आली होती त्या कानाजवळ ती कोमल–कोरकतुल्य बद्ध-मुष्टि स्थिर करून ती कुलसमला ह्मणाली " आमिएट साहेबानें दोन दिवस तुला कशाकरितां बोलावून नेलें होतें त्याचें खरें कारण सांग पाहूं?"

कुलसम—तुह्मांला कांहीं तकलीफ होते आहे कीं काय ह्याची चौकशी करण्याकरितां. साहेबांची इच्छा ही आहे कीं, जोंपर्यंत आपण त्यांच्या ताब्यांत आहों तोंपर्यंत आपणांस कांहीं तकलीफ नसावी. परमेश्वर करो आणि आपणांला असेंच सदैव ह्यांच्या ताब्यांत रहावें लागो.

दलनीनें ती बद्धमुष्टि अधिकच वर केली आणि ती ह्मणाली " पर-मेश्वर करो आणि तुला लवकर मरण येवो."

कुलसम—इंग्रजांच्या हातून सुटलों तर आपण नबाबाच्या हातीं पडूं. नबाब तुह्मांला क्षमा करील पण मला मात्र खास करणार नाहीं. तर मला दुसरीकडे कोठें आश्रय मिळाला तर नबाबाच्या पुढें मी कधींही जाणार नाहीं.

दलिनीनें आपली रागिट मुद्रा पालटली. आणि गद्गदस्वरानें ती ह्मणाली " मी अनन्यगतिक आहे. मरायचें झालें तरी मला नबाबाच्या पायाशींच मेलें पाहिजे. "

इकडे आमिएट साहेबानें आपल्या लोकांस तयार राहण्याचा इशारा दिला. जॉनसन् ह्मणाला " ह्या ठिकाणीं आपण तितके निर्भय नाहीं. नावा रेसिडेन्सीनजीक नेणें चांगलें नाहीं का ? "

आमिएट ह्मणाला " ज्या दिवशीं इंग्रज देशीलोकांच्या भयानें पळतील, त्याचदिवशीं भारतवर्षांत इंग्रजसाम्राज्य स्थापन होण्याची आशा ठार बुडाली असें समजावें. येथून नावा सोडतांच आपण भिऊन पळालों असें मुसलमानांस वाटेल. येथेंच राहून मरणें बरें, पण भिऊन पळणें नको. पण फॉस्टर अजारी आहे. लढाई करण्यास तो असमर्थ आहे. ह्मणून त्याला रेसिडेन्सीकडे पाठविण्याचा बेत करावा. त्याच्याच नौकेंतून बेगम व दुसरी स्त्री ह्यांची रवानगी करावी. बरोबर थोडे शिपाई पाठवावेत. लढाईचे ठिकाणीं त्यांना असूं देणें योग्य नाहीं. "

शिपाई लोक सज्ज झाले व आमिएटच्या आज्ञेप्रमाणें नौकेंत छपून बसले. नावेच्या सभोंवार लहान छिद्रें होतीं. त्या प्रत्येक छिद्राजवळ एकेक शिपाई बंदुक घेऊन बसला. आमिएटच्या आज्ञेवरून दलिनी व कुलसम् फॉष्टरच्या नौकेवर जाऊन बसल्या. बरोबर दोन शिपाई घेऊन फॉष्टरनें नौका हांकारली. तें पाहून महंमद तकीचे शिपायांनीं त्याला जाऊन बातमी दिली.

ती बातमी ऐकून व इंग्रजांची खान्याला येण्याची वेळ टळून गेली असें पाहून महंमद तकीनें त्यांना बोलावून आणण्याकरितां आपले दूत पाठविले. आमिएटनें उलट जबाब पाठविला कीं कांहीं कारणांमुळें आह्मांला येतां येत नाहीं.

नावेंतून उतरून थोडे दूर गेल्यावर त्या दूतानीं एक वायबार काढिला. त्या आवाजाबरोबर तीरावरून दहा बारा आवाज निघाले. आमिएटनें पाहिलें तों नौकेवर गोळ्यांचा वर्षाव होत आहे व कांहीं गोळ्या नौकेंतही शिरताहेत.

तिकडे इंग्रजांच्या शिपायांनींही उलट वर्षाव सुरू केला. दोन्ही पक्षांकडून एकमेकांवर नेम धरून बंदुका सुटूं लागल्या. पण दोन्ही पक्षही दडून बसलेले. मुसलमान लोक तीरावरच्या घरांच्या आड दडून होते व इंग्रजलोक नांवेच्या आंत दडून होते. अशा प्रकारच्या युद्धांत केवळ दारूच्या खर्चाशिवाय दुसरा कांहीं फायदा दिसला नाहीं.

नंतर मुसलमान लोक आपली जागा सोडून हातीं तरवारी घेऊन आमिएटच्या नौकेकडे धांवले. पण स्थिरप्रतिज्ञ इंग्रजलोक भ्याले नाहींत. नौकेवर चाल करून येणाऱ्या त्या मुसलमान शिपायांवर अचुक नेम धरून आमिएट, गलष्टन व जॉनसन हे प्रत्येक बारास एकेका शिपायाला जमीनदोस्त करूं लागले.

पण ज्याप्रमाणें लाटामागून लाटा येंतात त्याप्रमाणें मुसलमान शिपायांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या. तेव्हां आमिएट ह्मणाला " आतां आपल्या बचावाचा मार्ग उरला नाहीं. चला आपण आतां विधर्मी लोकांचा संहार करीत करीत प्राणत्याग करूं. "

इतक्या वेळांत कांहीं मुसलमान लोक आमिएटच्या नौकेवर चढले. व दुसरे कित्येक नावेच्या तळावर घणाचे घाव घालूं लागले. नावेच्या तळाला भोंक पडून नाव पाण्यानें भरूं लागली.

आमिएट आपल्या बरोबरच्या लोकांना ह्मणाला " अशा तऱ्हेनें आपण बुडून कां मरावें ? बाहेर चलूं आणि हातीं शस्त्र घेऊन वीराप्रमाणें लढून मरूं. "

नंतर हातीं तरवारी घेऊन ते तिघे इंग्रज त्या अगणित यवनसैन्यापुढें येऊन उभे राहिले. एक यवन शिपाई आमिएटला सलाम करून ह्मणाला " मरतां कां उगीच ? आमच्या बरोबर चला. "

आमिएट ह्मणाला " आह्मी मरणार. आज आमच्या ह्या ठिकाणीं मरण्यानें जो अग्नि पेटेल त्यानें मुसलमानी राज्य दग्ध होईल. आमच्या

रक्तानें जमीन भिजली तर तिसऱ्या जॉर्जची राजपताका ह्या ठिकाणीं स्थापित होईल. "

" मरा तर मग. " असें ह्मणून एका पठाणानें आमिएटचें शिर उडविलें. तें पाहतांच मोठ्या शिताफीच्या हातानें गलष्टननें त्या पठाणाचें शिरही धडावेगळें केलें.

नंतर दहाबारा मुसलमान गलष्टनला घेरा घालून त्याला वार करूं लागले. अशा रीतीनें पुष्कळ शिपायांचे वार लागून गलष्टन व जॉनसन हे दोघेही मृत होऊन खालीं पडले.

त्याच्या पूर्वींच फॉष्टरची नौका निघून गेली होती.

---

## द्वितीय परिच्छेद.

### पुन्हां तोच.

रामचरणाची गोळी लागून फॉष्टर नदींत पडला व प्रताप आपली नाव घेऊन दूर गेला. तेव्हां हत्यारांच्या नौकेवरील नावाड्यांनीं फॉष्टरचें कलेवर धुंडून काढण्याकरितां पाण्यांत उड्या टाकिल्या. नावेच्या जवळच त्याचें कलेवर तरंगत होतें. नावाड्यांनीं तें कलेवर उचलून नावेंत ठेविलें व आमिएटकडे बातमी पाठविली.

आमिएट त्या नौकेवर आला. त्यानें पाहिलें तों फॉष्टर अगदीं अचेतन झाला आहे पण त्याचा प्राण मात्र गेलेला नाहीं, असें त्याच्या दृष्टीं पडलें. डोक्याला जखम लागल्यामुळें तो अचेतन पडला होता. त्याच्या वाचण्याचा संभव फार थोडा होता. पण आमिएट वैद्यकी जाणत होता त्यानें जखमेची चिकित्सा केली. आणि बकाउल्लाचे मसलतीप्रमाणें त्यानें ती नौका घांटावर आणिली. व मोंगीरला जाण्याचे वेळीं फॉष्टरला आपल्या बरोबर नेलें.

फॉष्टरच्या आयुष्याची दोरी मोठी बळकट होती. कारण, औषधोपचारानें तो बरा झाला व मुरशिदाबादेच्या दंग्यांतूनही निभावला.

फॉष्टरनें आपली नौका जलदी चालविली. मुसलमानलोक आपला पाठलाग करीत येतील ही त्याला भीति होती. काशिमबाजारच्या रेसिडेन्सीचा आश्रय करावा असें प्रथम त्याच्या मनांत आलें—पण मुसलमान लोक तेथें देखील येतील अशी त्याला भीति पडली. ह्मणून त्यानें तो विचार सोडून दिला. फॉष्टरची कल्पना खरी ठरली. मुसलमानांनीं काशिमबाजारची रेसिडेन्सी लुटली.

फॉष्टर मोठ्या जलदीनें काशिमबाजार, फरासडांगा, सैदाबाद व रंगामाटी सोडून पुढें गेला. पण त्याची भीति गेली नाहीं. पाठीमागून येणारी प्रत्येक नौका मुसलमानांची आहे कीं काय असा त्याला धाक पडे. एक नौका मात्र अगदीं आपल्या नौकेच्या बरोबर चालली आहे असें त्याला आढळून आलें.

आतां आपलें रक्षण कसें करावें ह्याचा फॉष्टर विचार करूं लागला. चित्त ठिकाणावर नसल्यामुळें नानातऱ्हेचे विचार त्याच्या मनांत येऊं लागले. एकदां त्याच्या मनांत आलें कीं, नावेंतून उतरून पळून जावें. पुन्हां त्याला वाटलें कीं, पळण्याचें आपणाला त्राण नाहीं. पुन्हां वाटलें कीं, पाण्यांत उडी टाकावी. पण पाण्यांत उडी टाकून वांचावयाचें कसें ? पुन्हां असा विचार त्याच्या मनांत आला कीं, ह्या नावेंतल्या स्त्रियांना खालीं लोटून द्यावें; ह्मणजे नाव हलकी होऊन जास्त झपाट्यानें चालेल.

अकस्मात् त्याच्या मनांत एक कुकल्पना आली. ह्या स्त्रियांकरितांच यवन लोक आपला पाठलाग करिताहेत असा त्याच्या मनाचा पक्का ग्रह झाला. दलिनी नबाबाची बेगम हें त्याला ऐकून माहीत होतें. बेगमकरितांच इंग्रजांच्या नौकेवर मुसलमानांनीं हल्ला केला असावा. आपण बेगमेला सोडून दिलें तर मागचा सर्व त्रास चुकेल. दलिनीला लोटून देण्याचा त्यानें पक्का निश्चय केला.

तो दलिनीला ह्मणाला " आपल्या पाठोपाठ येणारी ही नौका दिसते आहे ना ? "

दलिनी ह्मणाली " होय, दिसते आहे. "

**फॉस्टर**— ही तुमच्या लोकांची नौका आहे व तुह्मांला घेऊन जाण्याकरितां ही आपल्या मागोमाग येते आहे.

असें वाटण्याचें कारण काय ? कांहीं नाहीं. केवळ फॉष्टरचा भ्रम. त्याला रज्जूचा सर्प भासूं लागला. दलिनीनें विचार केला असता तर ही गोष्ट खोटी आहे अशी तिची देखील खात्री झाली असती. पण ज्याच्या मनांत जी गोष्ट घोळत असते ती त्याला सर्वत्र दिसूं लागते व तो विचार-पराङ्मुख होतो. आपली केव्हां सुटका होते आहे असें दलिनीला झालें असल्यामुळें तिला तें सर्व खरें वाटलें व ती ह्मणाली " तर मग त्या नौकेवर आह्मांला पोंचवून द्या. मी तुह्मांला पुष्कळ रुपये देईन. "

**फॉष्टर**—तें मजकडून होणें नाहीं. आह्मी जर त्या लोकांचे हातीं पडलों तर ते आह्मांला ठार मारतील.

**दलिनी**—मी त्यांना मना करीन.

**फॉष्टर**—ते तुमचें ऐकणार नाहींत. तुमच्या देशाचे लोक बायकांचें सांगणें ऐकत नाहींत.

व्याकूळ झाल्यामुळें दलिनीचें ज्ञान नष्ट झालें—चांगल्या वाईटाचा तिला विचार राहिला नाहीं. जर ही आपल्या लोकांची नौका नसली तर काय होईल ह्याचा तिनें विचार केला नाहीं. ती ह्मणाली " तर मग तुह्मी आह्माला किनाऱ्यावर पोंचवून निघून जा. "

फॉष्टरनें मोठ्या आनंदानें त्या ह्मणण्याला रुकार दिला. व नाव किनाऱ्याला लावण्याविषयीं नावाड्यांना हुकुम दिला.

कुलसम् ह्मणाली " मी खालीं उतरणार नाहीं. मी नबाबाच्या हातीं पडलें तर माझें काय होईल तें सांगतां येत नाहीं. मी इंग्रजांबरोबर कलकत्त्यास जाईन. तेथें माझ्या ओळखीचे पुष्कळ लोक आहेत. "

दलिनी ह्मणाली "तूं कांहीं काळजी करूं नकोस. जर मी वांचलें तर तुझें रक्षण अवश्य करीन."

कुलसम्—तुह्मी वांचला तर ?

कांहीं केल्या कुलसम राजी होईना. दलिनीनें तिची पुष्कळ विनवणी केली पण व्यर्थ.

फॉष्टर कलूसमला ह्मणाला "न जाणो, तुझ्याकरितां जर ती नांव आमच्या पाठोपाठ आली तर ? तूंही खालीं उतर."

कुलूसम ह्मणाली "जर तुह्मी मला सोडून दिलें तर त्या नौकेंतील लोकांना तुमचा पाठलाग करण्याचें सोडूं नका ह्मणून मी सांगेन."

फॉष्टर घाबरला व कांहीं बोलला नाहीं. कुलूसम येत नाहीं असें पाहून दलिनी थोडी दुःखित झाली व नावेंतून खालीं उतरली. फॉष्टरनें नाव चालूं केली. ह्यावेळीं सूर्यास्ताचा सुमार झाला होता.

हळू हळू फॉष्टरची नौका दिसेनाशी झाली. जी नौका मुसलमानांची समजून फॉष्टरनें दलिनीला तीरावर सोडिलें ती नौका जवळ आली. आपल्याला घेऊन जाण्याकरितां ती नाव तीरावर येईल असें दलिनीला क्षणोक्षणीं वाटूं लागलें पण व्यर्थ. नावेवरील लोकांनीं कदाचित् आपल्याला पाहिलें नसेल असें समजून ती आपल्या वस्त्राचा पदर हात वर करून त्यांना इशारत देण्याकरितां हालवूं लागली. तरीही नौका परत आली नाहीं. तेव्हां ती नाव आपल्या लोकांची नसून दुसऱ्या कोणाची तरी असावी असें तिला वाटलें. वेड्यासारखी ती त्या नावेवरील लोकांना मोठ्यानें हांका मारूं लागली. "ह्या नौकेंत जागा नाहीं" असें ह्मणून ते लोक निघून गेले.

दलिनीच्या डोक्यावर वज्राघात झाल्यासारखें झालें. फॉष्टरची नौका दिसेनाशी झाली होती तरी ती आपल्याला मिळेल ह्या हेतूनें दलिनी नदीच्या कांठाकांठानें धांवत सुटली. फार लांब गेली तरी तिला नौका आढळली नाहीं. रात्र पडून बराच वेळ झाल्यामुळें अंधकार पडला हो-

ता. गंगेच्या प्रवाहांत नाव कोठेंही दिसत नव्हती. अंधारामध्यें पाण्याच्या प्रवाहाच्या खळखळ ध्वनीशिवाय दुसरें कांहीं ऐकूं येत नव्हतें. नंतर हताश होऊन दलिनी प्रथम जमिनीवर स्वस्थ बसली.

येथें बसून आतां कांहीं फायदा नाहीं असें समजून दलिनी उठली. पण तिला जाण्यास मार्ग दिसेना. दोनतीनदां ती अडखळून पडली देखील. नक्षत्रांच्या अंधक प्रकाशांत तिनें चोहोंकडे एकवेळ दृष्टि फेंकली; पण जवळपास कोठें गांव असल्याचें तिला कांहींच चिन्ह दिसेना. मनुष्याचें तर नांव नाहीं; कोणत्याच दिशेला दिवा दिसेना, गांव दिसेना, वृक्ष दिसेना, मार्ग दिसेना, कुत्र्याकोल्ह्यांशिवाय दुसरा प्राणी दिसेना. नदीच्या प्रवाहांत फक्त नक्षत्रें हालत असलेलीं दिसत होतीं. दलिनीनें प्राण देण्याचा निश्चय केला.

तेथेंच नदीच्या कांठावर दलिनी बसली. जवळच रातकिडयांचे शब्द होऊं लागले व कोल्ह्याचें ओरणें सुरूं झालें. गाढ अंधकार पडत चालला. दोन प्रहर रात्रीच्या सुमारास एक दीर्घाकार पुरुष त्या प्रदेशांत एकटा हिंडत असलेला तिच्या दृष्टीस पडला. तो पुरुष कांहीं न बोलतां दलिनीच्या पाठीमागें येऊन बसला.

पुन्हां तोच ! [illegible] शैवलिनीला उचलून पर्वतावर नेलें होतें.

---

## तृतीय परिच्छेद.

### नृत्यगीत.

मोंगीरांत एका भव्य वाड्यांत स्वरूपचंद जगत्शेट व माहताबचंद जगत्शेट या नांवाचे दोन भाऊ रहात होते. त्या वाड्यांत एके दिवशीं रात्री पुष्कळ दिवे लागले होते. तेथें संगमरवरी शुभ्र मंडपांत त्या दिव्यांचीं प्रतिबिंबें पडलीं होतीं. पाण्यांत पाणी मिळतें आणि तेजांत तेज मिळतें. त्या प्रमाणें दिव्याचा प्रकाश शुभ्र पाषाणस्तंभांत, देदीप्यमान् सुवर्णमुक्ताखचित सिंहासनांत, रत्नखचित अशा अत्तर व गुलाबदाण्यांत, शेटजींच्या कंठहारांतील स्थूल मुक्ताहारांत व कलावंतिणींच्या कंठ, कर्ण व शिरोभूषणांतील रत्नांत प्रतिबिंबित होत होता. त्याबरोबरच गायनाचा मधुरध्वनि उठून जसा कांहीं तेजांतच मिसळून जात होता. उज्वल आणि मधुर ह्यांचा हमेशा मिलाफ होतो. जसें—रात्रीच्या नीलाकाशांत चंद्रोदय होतो त्यावेळीं, सुंदरीच्या सजल नीलेंदीवर लोचनांपासून विद्युच्चकित कटाक्ष विक्षिप्त होतो त्यावेळीं, स्वच्छ आणि नील अशा सरोवरामध्यें विकासोन्मुख नलिनीपंक्तीला बालसूर्याचे सुवर्णोज्वल किरण विकसित करितात त्यावेळीं, नीलजलांतील क्षुद्र क्षुद्र तरंगमालांवर सूर्यकिरणें पडून पद्मपत्रस्थ जलबिंदूंना उज्वलित करितात, तसेंच पाण्यांतील पक्षिसमुदायाला मधुरकंठानें शब्द करावयास लावितात व जलपद्मांना विकसित करितात त्यावेळीं, तुमच्या गृहिणींच्या पायांतील जडावाच्या अलंकारांवर सूर्यकिरण पडतात त्यावेळीं, संध्याकाळीं गगनमंडलांतील सूर्यतेज अस्तास जात आहे हें पाहून अंधकार त्याच्या पाठोपाठ धांव घेतो त्यावेळीं, तुमची गृहिणी कर्णभूषणें हालवीत हालवीत तुह्मी नको नको ह्मणत असतां तुमच्या पाठीमागें धांवत येते त्यावेळीं, चंद्रकिरणांनीं प्रकाशणाऱ्या गंगाजलांत वायूच्या आघातानें फेनयुक्त लाटा उसळून त्यांत

चंद्रप्रकाश प्रतिबिंबित होतो त्यावेळीं, स्फटिक पात्रामध्यें चकचकणारें शांपेन नामक मद्य ओतून त्यावर फेस उठतो त्यावेळीं, चंद्रप्रकाशयुक्त रात्रीं दक्षिणवायू सुटतो त्यावेळीं, पंचपक्वान्नाचें भोजन मिळून वर पुष्कळसे रुपये दक्षणा मिळते त्यावेळीं, प्रभातकाळच्या सूर्यकिरणांत हर्षोत्फुल्ल होऊन वसंतकोकिल आनंदानें गाऊं लागतो त्यावेळीं, तसेंच दिव्याचे प्रकाशांत रत्नाभरणांनीं भूषित होऊन सुंदर स्त्री गाऊं लागते त्यावेळीं उज्वल आणि मधुर ह्या दोहोंचा मिलाफ होतो.

उज्वल व मधुर ह्या दोहोंचा मिलाफ झाला खरा. परंतु शेटजींच्या अंतःकरणाला मात्र त्याचें कांहीं नाहीं. त्यांच्या अंतःकरणांशीं गुरगन्खांचा मिलाफ झाला होता.

बंगाल्यांत ह्यावेळीं समराग्नि चेतला होता. कलकत्त्याहून परवानगी येण्याचे पूर्वींच पाटणा येथील इलिस् साहेबानें पाटण्याच्या किल्ल्यावर हल्ला केला होता. प्रथम तो तेथील किल्ल्याचा अधिकारी होता. परंतु मोंगीर येथील मुसलमान सैन्य पाटण्यास येऊन त्यांचा तेथील सैन्याशीं जेव्हां मिलाफ झाला, तेव्हां पाटणा शहर व किल्ला हीं पुन्हां मुसलमानांच्या हातीं गेलीं. पाटणा येथें असलेले इलिस् व दुसरे इंग्रज लोक मुसलमानांच्या हातीं लागले व त्यांना कैदी करून ते मोंगिरास घेऊन आले. ह्यावेळीं दोन्ही पक्षांची खरोखर लढाईची तयारी चालू होती. शेटजींचें ह्याच विषयावर गुरगनखानाशीं संभाषण चाललें होतें. नाच व गाणें केवळ निमित्ताला होतें. जगत्शेट बंधूंचें व गुरगनखांचें तिकडे बिलकुल लक्ष नव्हतें.

गुरगनखांची ईप्सित सिद्धि झाली—त्यानें विचार केला कीं, दोन्ही पक्ष विवाद करितां करितां क्षीणबल झाले ह्मणजे त्या दोघांनाही जिंकून आपण बंगालचे नबाब व्हावें. पण त्या अभिलाषसिद्धीला अवश्य लागणारी पहिली गोष्ट ह्मणजे सैन्य वश व आज्ञांकित असलें पाहिजे. पैशाची लालुच दाखविल्याशिवाय सैन्य वश होणें शक्य नाहीं. शेटजीं-

च्या मदतीवांचून पैसा मिळण्यास मार्ग नाहीं. ह्मणून शेटजींना आपल्याकडे वळवून घेणें गुरगनखांला अवश्य झालें.

इकडे कासिम अलिखांला असें पक्कें वाटत होतें कीं, ज्या पक्षाला हे कुबेरतुल्य बंधु मदत करतील त्या पक्षाची हटकून सरशी होईल. व जगत्‌शेट तर आपले हितशत्रु असा त्याचा ग्रह होता. कारण ते त्याच्याशीं कधींही नीट वागत नव्हते. ह्मणून संशयावरून कासिम अलीखानें त्यांना बंदिवानांप्रमाणें मोंगिरास आणून ठेविलें होतें. पण संधि सांपडतांच ते शत्रूला जाऊन मिळतील ह्या भीतीनें त्यांना किल्यांत अडकवून टाकण्याचा त्याचा विचार होता. शेटजींना ह्याची बातमी लागली होती. भीतीमुळें आतांपर्यंत त्यांनीं मीरकासीमाच्या विरुद्ध कांहीं आचरण केलें नव्हतें. पण आतां आत्मसंरक्षणाचा दुसरा मार्ग न राहिल्यामुळें ते गुरगनखांला मिळाले. मीरकासिमाचा नाश व्हावा हें दोघांनाही इष्ट होतें.

पण कारणाशिवाय गुरगनखांची भेट घेतली तर नबाबाला संशय येईल; ह्मणून जगत्‌शेटांनीं मुद्दाम ह्या नाचगाण्याचा समारंभ करून गुरगनखां व इतर उमरराव यांना निमंत्रण देऊन एकत्र केलें होतें.

गुरगनखां नबाबाची परवानगी घेऊन आला होता. ह्मणून तो इतर उमरावांपासून दूर बसला होता. जगत्‌शेट ज्याप्रमाणें सर्वांच्या जवळ जाऊन एकएक वेळ भाषण करीत होते, त्याचप्रमाणें गुरगनखांशींही करीत होते. पण तें इतरांना ऐकूं जाऊं नये अशा हलक्या स्वरानें होतें, इतकाच काय तो फरक. त्यांचें भाषण पुढें सांगितल्याप्रमाणें होतें.

**गुरगन**—आपण जोडीनें एक वखार काढूं. भागीदार होण्याची आपली इच्छा आहे काय ?

**माहताब**—उद्देश ?

**गुरगन**—मोंगिरची मोठी वखार बंद पाडण्याकरितां.

**माहताब**—कबूल आहे. अशा प्रकारचा कांहीं धंदा काढल्याशिवाय आह्मांला गति नाहीं.

**गुरगन**—जर आपली कबुली आहे तर पैशाची व्यवस्था आपणांलाच केली पाहिजे. मी अंगमेहनत करीन.

त्यावेळीं मनियाबाई कळवंतीण एक ख्याल गात गात जवळ आली. माहताबचंद हासून ह्मणाला “ कोणाला उद्देशून तूं हा ख्याल गातें आहेस ! ” जाऊं दे तें. आमची कबुली आहे. आमच्या मुदलावर योग्य व्याज मिळालें ह्मणजे झालें. मग आमची कांहीं तकरार नाहीं.

एकीकडे कळवंतीण केदार, हम्मीर, छायानट इत्यादि राग गात होती व दुसरीकडे गुरगनखां व जगत्शेट रुपये, नुकसान, दर्शनी वगैरे गोष्टींचा खल करीत होते. त्यांचा निश्चय ठरल्यावर गुरगनखां ह्मणाला “ कोणी एक नवीन बनिया वखार काढतो आहे; तुह्मीं कांहीं ऐकिलें आहे काय ?

**माहताब**—देशी कीं विलायती ?

**गुरगन**—देशी.

**माहताब**—कोठें ?

**गुरगन**—मोंगिरापासून मुर्शिदाबादपर्यंत सर्व ठिकाणीं जेथें जेथें पहाड, जंगल, व सपाट प्रदेश आहे तेथें तेथें त्याची वखार लागणार आहे.

**माहताब**— पैसेवाला कसा काय आहे ?

**गुरगन**— सध्यां फार पैसेवाला नाहीं—पण पुढें काय होईल तें सांगतां येत नाहीं.

**माहताब**— त्याचा व्यवहार, देणें घेणें वगैरे कोणाशीं आहे ?

**गुरगन**— मोंगीरच्या मोठ्या वखारीशीं.

**माहताब**— तो हिंदु आहे कीं मुसलमान ?

**गुरगन**—हिंदु.

**माहताब**—त्याचें नांव काय ?

**गुरगन**—प्रतापराय.

**माहताब**—त्याचें घर कोठें ?

**गुरगन**—मुर्शिदाबादेजवळ.

**माहताब**—त्याचें नांव ऐकलें आहे. आहे एक साधारण मनुष्य.

**गुरगन**—तो फार भयंकर आहे.

**माहताब**—मुद्दाम असें करण्याचा त्याचा उद्देश काय ?

**गुरगन**—कलकत्त्याच्या मोठ्या वखारीवरील राग.

**माहताब**—तर मग त्याला वळविला पाहिजे. तो कोणाला वश आहे बरें ?

**गुरगन**—वखारी काढण्याचा त्याचा उद्देश समजल्याशिवाय तें सांगतां येणार नाहीं. जर पैशाच्या लोभानें तो हें कृत्य करण्यास प्रवृत्त झाला असेल तर त्याला वश करून घेण्यास किती उशीर ? त्याला तालुकदारी जमीनदारी देखील देईन. पण त्याचा अतस्थ दुसरा हेतु असला तर ?

**महताब**—दुसरा हेतु काय असणार ? प्रतापराय इतका उन्मत्त कशानें झाला ?

कळवंतीण ह्या वेळीं " गोरे बदनपर शाम दिठोना "
ही चीज ह्मणत होती.

**माहताब**—तें काय ? कोणाचें गोरें मुख ?

---

## चतुर्थ परिच्छेद.

### दलिनीनें काय केलें.

तो महाकाय पुरुष मुकाट्यानें येऊन दलिनीच्या मागें बसला. दलिनीनें भीतीनें रडणें आवरलें व तीही मुकाट्यानें बसली. इकडे हा प्रकार चालला होता त्याचवेळीं दुसरीकडे दलिनीवर आणखी एक संकट ओढवत होतें.

नबाबाचा महंमद तकीला असा गुप्त हुकूम होता कीं, इंग्रजांच्या नौका हस्तगत करून दलिनीला मोंगिरास पाठवून द्यावें. महंमद तकीनें विचार केला कीं इंग्रजांची नौका हस्तगत झाली ह्मणजे सहजच दलिनी आपल्या हातीं लागेल. ह्मणून त्यानें दलिनीसंबंधानें आपल्या लोकांना कांहीं एक सांगितलें नव्हतें. पण नौका हस्तगत झाल्यावर जेव्हां त्यांत दलिनी नाहीं असें दिसून आलें तेव्हां त्याला मोठी फिकीर पडली. आपल्या ह्या चुकीबद्दल नबाब आपणावर काय प्रसंग आणील त्याची त्याला कल्पना होईना. तो अगदीं घाबरून गेला व त्यानें नबाबाला खोटीच बात सांगून फसविण्याचा निश्चय केला. त्या वेळीं चोहोंकडे अशी वदंता होती कीं, युद्ध सुरू होतांच इंग्रजलोक मीरजाफरास बंदींतून मुक्त करून पुन्हां सिंहासनावर बसवितील. इंग्रज विजयी झाल्यावर जरी माझी ही लुच्चेगिरी मीरकासिमाला समजली तर कांहीं फिकीर नाहीं. पण जर मीरकासीम विजयी झाला तर त्याला माझ्या हेतूचा कांहीं एक मागमूस लागतां उपयोगी नांहीं असा बंदोबस्त केला पाहिजे. मग कांहीं भीतीचें कारण नाहीं. असा संकल्प करून त्यानें त्या रात्रीं नबाबाकडे मिथ्याकथापरिपूर्ण असें एक पत्र पाठविलें.

महंमद तकीनें नबाबाला लिहिलें कीं, दलिनी आमिएटच्या नौकेंत सांपडली. तिला मोठ्या सन्मानानें आणून किल्ल्यांत ठेविली आहे. परंतु हुजूरचा पुन्हां हुकूम येईपर्यंत तिला तिकडे पाठवितां येत नाहीं. कारण, इंग्रजांचे नौकेवर असलेले सर्वलोक असें सांगतात कीं, दलिनी ही आमिएट जवळ उपपत्नी ह्या नात्यानें रहात होती. दोघें एका शय्येवर शयन करीत. दलिनीनेंही स्वतः ही गोष्ट आपल्या तोंडानें कबूल केली. तिनें ख्रिस्तिधर्माची दीक्षा घेतली आहे. मोंगिरास जाण्याचें तिच्या मनांत नाहीं. ती ह्मणते " मला सोडून द्या मी कलकत्त्यास जाऊन आमिएटसाहेबाच्या मित्राजवळ राहीन. जर तुह्मी मला सोडिलें नाहीं तर मी पळून जाईन. व मोंगिरास पाठविलें तर मी जीव देईन. " तर अशा

स्थितींत तिला मोंगीरास पाठवूं कीं येथेंच ठेवूं ? कीं सोडून देऊं ? ह्याबद्दल हुजूरच्या आज्ञेची मार्गप्रतीक्षा करीत आहे. हुजूरची जशी आज्ञा येईल तशी व्यवस्था करीन. इत्यादि.

एक घोडेस्वार त्याच रात्रीं हें पत्र घेऊन मोंगीरास गेला.

मनुष्याच्या मनाला भावी दुश्चिन्ह दुरून समजतें असें कोणी कोणी ह्मणतात. ही गोष्ट सर्वांशीं खरी नाहीं. परंतु ज्याक्षणीं तो घोडेस्वार दलिनीसंबंधाचें वर सांगितलेलें पत्र घेऊन मोंगिरास जाण्यास निघाला त्याचक्षणीं दलिनीचें शरीर रोमांचित झालें. त्याचक्षणीं तिच्या पाठीमागें बसलेल्या पुरुषानें प्रथम बोलण्यास आरंभ केला. मग त्याच्या भाषणाच्या आवाजानें ह्मणा, अगर दुश्चिन्हाच्या सूचनेनें ह्मणा, कशानेंही असो, त्याचक्षणीं तिचें शरीर पुलकित झालें.

**पुरुष**—मीं तुला ओळखिलें. तूं दलिनी बेगम.

दलिनी कांपूं लागली.

**पुरुष**—मला वाटतें, कोणी दुष्टानें तुला ह्या रानांत आणून सोडिलें असावें.

दलिनीच्या नेत्रांतून पुन्हां अश्रुप्रवाह सुरू झाला. तो पुरुष ह्मणाला " आतां तूं जाणार कोठें ? "

एकदम दलिनीची भीति दूर झाली. भीति जाण्याला तिला विशेष कारण झालें. दलिनी पुन्हां रडूं लागली. त्या पुरुषानें पुन्हां तोच प्रश्न केला. दलिनी ह्मणाली " जाणार कोठें ? जाण्याला मला कोठें जागाच उरली नाहीं. एक जागा आहे पण ती फार दूर पडली. कोण मला तेथें पोंचवील ? "

तो पुरुष ह्मणाला " तूं नबाबाकडे जाण्याचा विचार सोडून दे. "

नबाबाकडे जाण्याविषयीं उत्कंठित झालेली दलिनी विस्मित होऊन ह्मणाली " कां बरें ? "

**पुरुष**—तुझें वाईट होईल

दलिनी—झालें तरी हरकत नाहीं. मला आतां दुसरें स्थान नाहीं. दुसरीकडे जाऊन कल्याण होण्यापेक्षां पतीकडे जाऊन वाईट झालेलें पतकरलें.

पुरुष—ऊठ तर मग. मी तुला मुर्शिदाबादेस महंमद तकीकडे पोंचवितों. तो तुला मोंगीरास पोंचवील. पण माझी एक गोष्ट ऐक. आतां युद्धास सुरुवात झाली आहे. स्वतः नवाब आपल्या लोकांना रोहीदास किल्ल्यावर पाठविण्याच्या विचारांत आहे. तूं तिकडे जाऊं नकोस.

दलिनी—माझ्या दैवीं असेल तें होईल. मी जाणार.

पुरुष—मोंगीर पुन्हां तुझ्या दृष्टीस पडणार नाहीं.

दलिनी विचारांत पडली आणि म्हणाली " भवितव्य कोणाला कळणार ? चला, मी आपणाबरोबर मुर्शिदाबादेस चलतें. जोंपर्यंत शरिरांत प्राण आहे तोंपर्यंत नवाबाच्या दर्शनाची माझी इच्छा नाहींशी होणार नाहीं.

पुरुष—तें मला माहीत आहे. चल तर मजबरोबर.

तीं दोघेंजण त्या अंधाऱ्या रात्रीं मुर्शिदाबादेस जाण्यास निघालीं. दलिनी पतंगाप्रमाणें अग्नींत उडी टाकण्यास सिद्ध झाली.

---



# चंद्रशेखर.



## षष्ठखंड.



## सिद्धि.



## प्रथम परिच्छेद.



### पूर्वकथा.

पूर्वी जी हकीकत सांगितली नाहीं ती येथें संक्षेपानें सांगतों. पूर्वी सांगितलेला ब्रह्मचारी हा चंद्रशेखरच होता हें वाचकांना समजलेंच आहे.

ज्या दिवशीं आमिएट, फॉष्टरसह मोंगिराहून निघाला त्याच दिवशीं रमानंद स्वामीला फॉष्टर व दलिनीबेगम आमिएटबरोबर गेल्याचें समजलें. चंद्रशेखराशीं स्वामीची गंगातीरीं भेट झाली. त्यावेळीं त्यांनीं त्याला वरील हकीकत सांगितली आणि ते ह्मणाले "येथें राहण्याचें तुझें आतां कांहीं प्रयोजन नाहीं. तूं स्वदेशीं जा. शैवलिनीला मी काशीस पाठवितों. ज्या परहितव्रताची तूं आजपासून दीक्षा घेतली आहेस तें अबाधित चालूं दे. ही धर्मिष्ट यवनकन्या ह्यावेळीं संकटांत पडली आहे. तूं हिच्या पाठोपाठ जा आणि साधल्यास तिच्या सुटकेचा उपाय कर.

प्रतापही तुझा संबंधी व उपकारकर्ता आहे. तुझ्यामुळेंच तो संकटांत पडला आहे. ह्या प्रसंगीं त्यालाही सोडतां उपयोगीं नाहीं. त्यांच्या पाठोपाठ जा." नबाबाला ह्या गोष्टीची बातमी देण्याचें चंद्रशेखराच्या मनांत होतें. पण रमानंदानें निषेध केला आणि सांगितलें "मी नबाबाकडे बातमी पाठवीन." गुरूच्या आज्ञेवरून एका लहान नावेंत बसून चंद्रशेखर आमिएटच्या मागोमाग निघाला. रमानंद स्वामीही त्यावेळेपासून शैवलिनीला काशीस पाठविण्याचे कामीं उपयोगीं पडेल असा एखादा शिष्य धुंडूं लागले. इतक्यांत त्यांना समजलें कीं शैवलिनी ही एका पृथक् नौकेंत बसून इंग्रजांच्या पाठोपाठ जात आहे. रमानंदस्वामी मोठ्या संकटांत पडले. ती पापिष्टा फॉष्टरचा पाठलाग करते आहे कीं चंद्रशेखराचा ह्याचा त्यांना उलगडा होईना. स्वामी मनांतले मनांत विचार करून ह्मणाले "मला वाटतें ह्यावेळीं चंद्रशेखराकरितां मला संसाराच्या पाशांत पडावें लागणार." असा विचार करून तेही त्याच मार्गानें निघाले.

रमानंदस्वामी पुष्कळ दिवस पायीं देश विदेश फिरले होते. चालण्याचे त्यांना बिलकुल श्रम वाटत नसत. लवकरच त्यांनीं शैवलिनीची नौका गांठली. ते आहारनिद्रेच्या बिलकुल वश नव्हते. अभ्यासानें त्यांनीं सर्वांना वश करून घेतलें होतें. कांहीं वेळानें चंद्रशेखराचीही नौका येऊन पोंचली. तीरावर स्वामींना पाहून चंद्रशेखर तेथें आला आणि त्यानें स्वामीस प्रणाम केला.

रमानंदस्वामी ह्मणाले. "एक वेळ नवद्वीपास जाऊन गुरूजींची भेट घेऊन त्यांच्याशीं कांहीं संभाषण करण्याची इच्छा झाली आहे; चल, आपण बरोबर जाऊं". असें ह्मणून स्वामी चंद्रशेखराच्या नौकेंत चढले.

इंग्रजांच्या नौका चोहोंकडे पसरलेल्या पाहून त्यांनीं आपली नौका एका अडोशाच्या ठिकाणी लपवून ठेविली आणि ते तीरावर आले. शैवलिनीची नौका येऊन तीही अडोशाला उभी राहिलेली त्यांना दिसली. ते दोघेजण तीरावर गुप्तपणें उभे राहून सर्व प्रकार पाहूं लागले. प्रताप

व शैवलिनी पोहत पोहत निघून जाऊन एका नावेंत बसून पळून गेलीं हें त्यांच्या दृष्टीस पडलें. नंतर तेही नावेंत बसून त्यांच्या पाठोपाठ निघाले. प्रताप व शैवलिनी ह्यांनीं आपली नौका तीराला लावली असें पाहून ह्यांनींही आपली नाव थोड्या अंतरावर तीराला लावली. अनंत बुद्धिशाली रमानंद स्वामी चंद्रशेखराला ह्मणाले " पोहत असतांना प्रताप व शैवलिनी यांचें काय संभाषण चाललें होतें तें तूं कांहीं ऐकलेंस का ?

**चंद्रशेखर**—नाहीं.

**रमानंद**—तर आज रात्रीं निजूं नको. त्यांच्यावर नजर ठेव.

दोघेजण जागत राहिले. शेषरात्रीं शैवलिनी नौकेंतून निघून तीरावरील जंगलांत गेली. सकाळ झाली तरी ती आली नाहीं. हें त्यांनीं पाहिलें. नंतर रमानंद स्वामी चंद्रशेखरास ह्मणाले " हिच्या मनांत काय आहे तें कांहीं कळत नाहीं. चल आपण हिच्या मागोमाग जाऊं. "

नंतर ते दोघे तिच्या पाठोपाठ निघाले. रात्र पडल्यावर आकाश मेघांनीं व्याप्त झालें, तेव्हां रमानंद स्वामी ह्मणाले " तुझ्या बाहूंत किती शक्ति आहे ? "

चंद्रशेखर हांसला आणि त्यानें एक मोठासा दगड हातीं घेऊन खूप जोरानें दूर फेंकिला.

**रमानंद**—बहुत उत्तम. तूं शैवलिनीच्या जवळपास ऐस. ह्या प्रचंड तुफानांत तिला जर साहाय्य मिळालें नाहीं तर ती खास मरेल. जवळच एक माझ्या माहितीची गुहा आहे. मी जेव्हां सांगेन तेव्हां तूं शैवलिनीला उचलून घेऊन माझ्या पाठोपाठ ये.

**चंद्रशेखर**—आतां अंधार काळाकुट्ट पडेल. रस्ता दिसणार कसा ?

**रमानंद**—मी जवळच राहीन. माझ्या दंडाचें एक टोंक तुझ्या हातीं देईन व एक मी धरीन.

शैवलिनीला गुहेंत ठेवून चंद्रशेखर बाहेर आल्यावर रमानंद स्वामी मनाशीं विचार करूं लागले " आजपर्यंत मीं सर्व शास्त्रांचें अध्ययन केलें,

सर्व प्रकारच्या मनुष्यांशीं संभाषण केलें, पण व्यर्थ. ह्या बालिकेचें हृद्गत मला समजलें नाहीं. " असा विचार करून ते चंद्रशेखराला ह्मणाले " तेथून जवळच एक पार्वत्य (पर्वतांतील) मठ आहे. तेथें जाऊन तूं आज विश्रांति घे. शैवलिनीच्या संबंधानें जें कांहीं कर्तव्य होतें तें झालें. आतां तूं दलिनीच्या कामाला लाग. परहितावांचून आपल्याला इतर व्रत नाहीं हें ध्यानांत राख. शैवलिनीबद्दल कांहीं काळजी करूं नकोस, मी येथें आहें. पण तूं माझ्या अनुमतीशिवाय शैवलिनीची गांठ घेऊं नकोस. माझ्या सांगण्याप्रमाणें जर तूं वागशील तर शैवलिनीचें सर्वप्रकारें कल्याण होईल. "

चंद्रशेखर निघून गेला. नंतर रमानंद स्वामी मुकाट्यानें गुहेंत शिरले.

त्यानंतर काय काय झालें तें वाचकांना माहीत आहेच. चंद्रशेखर उन्मादग्रस्त शैवलिनीला त्याच मठांत रमानंद स्वामीजवळ घेऊन गेला आणि रडत रडत ह्मणाला " गुरुमहाराज, हें काय झालें? "

रमानंद स्वामींनीं शैवलिनीची स्थिति पूर्णपणें अवलोकन केली आणि किंचित् हासून ते ह्मणाले " झालें आहे तें उत्तम आहे. तूं कांहीं काळजी करूं नकोस. दोन दिवस तूं येथेंच रहा. नंतर हिला घेऊन स्वदेशीं जा. ज्या घरीं ही रहात होती त्याच घरांत हिला ठेव. हिच्या पूर्वीच्या मैत्रिणी हिजजवळ असूं दे. प्रतापालाही कधीं कधीं हिच्या दृष्टीस पडूं दे. मी मागाहून येतोंच. "

गुरूच्या आज्ञेप्रमाणें चंद्रशेखरानें शैवलिनीला घरीं आणिलें.

## द्वितीयपरिच्छेद.

### हुकूम.

इंग्रजांशीं युद्ध सुरू झालें. मीरकासिमाच्या अवनतीस प्रारंभ झाला. आरंभींच काटोया येथील युद्धांत मीरकासिमाचा पराभव झाला. त्यानंतर गुरगनखानाचें कपट दिसूं लागलें. नवाबाची पूर्ण निराशा झाली. ह्याच वेळीं त्याच्या बुद्धिभ्रंशास आरंभ झाला. कैदेंत असलेल्या इंग्रजांची कत्तल करण्याचा त्यानें बेत केला. कोणाशींच मन मोकळें करून तो वागेनासा झाला. ह्याच वेळीं महंमदतकीकडून दलिनीसंबंधाचें पत्र आलें. तें पत्र ह्मणजे पेटलेल्या अग्नींत घृत टाकल्याप्रमाणें झालें. इंग्रजलोक अविश्वासी झाले, सेनापतिही अविश्वासी होणारसें दिसतें. राज्यलक्ष्मीही विश्वासघातिनी. आणि अखेरीस दलिनीही विश्वासघातिनी ठरली ना? त्यानें लागलींच महंमदतकीला उत्तर लिहिलें " दलिनीला इकडे पाठविण्याची जरूर नाहीं. तिला तेथेंच विष देऊन मारून टाक. "

महंमदतकी आपल्या हातांत विषपात्र घेऊन दलिनीकडे गेला. तो जवळ आलेला पाहून दलिनी विस्मित झाली आणि मोठ्या रागानें ह्मणाली " खां साहेब, आपण माझी बेइज्जत करतां आहां. "

महंमदतकी कपाळावर हात मारून ह्मणाला " दुर्दैव माझें. नवाब आपल्यावर रागावला आहे. "

दलिनी किंचित् स्मित करून ह्मणाली " आपणांला हें कोणीं सागितलें ? "

महंमदतकी ह्मणाला " आपल्याला माझें बोलणें खरें वाटत नसेल तर हें शिक्कामोर्तबाचें पत्र पहा. "

**दलिनी**—आपल्याला पत्राचा अर्थ समजला नाहीं.

महंमदतकीनें तें शिक्कासहीचें पत्र दलिनीच्या हातीं दिलें. दलिनीनें तें

पत्र वांचून दूर फेंकून दिलें आणि हांसत हांसत ह्मटलें " हें बनावट आहे. माझ्याशीं असें कपट कां? मी तर त्यांच्याचसाठीं प्राण देण्यास तयार आहे."

**महंमद्**—आपण भिऊं नका. मी आपलें रक्षण करीन.

**दलिनी**—ओहो ! ह्यांत आपला कांहीं मतलब दिसतो. बनावट पत्र आणून मला भेवडविण्याचा आपला बेत असावा असें मला वाटतें.

**महंमद्**—ऐका तर. आपण आमिण्ट साहेबांजवळ उपपत्नी ह्या नात्यानें राहिला होतां असें मी नबाबाला लिहिलें होतें, त्यावर हा हुकुम आला आहे.

तें ऐकून दलिनीनें भुंवया चढविल्या. गंगेच्या प्रवाहाप्रमाणें शांत असलेल्या तिच्या ललाटपट्टिकेवर तरंग उठले. आपण मोठी चूक केली असें महंमदतकीला वाटलें. दलिनी ह्मणाली " असें आपण कां लिहिलें ? "

महंमदतकीनें आद्योपांत सर्व हकीकत तिला सांगितली.

नंतर दलिनी ह्मणाली " पुन्हां मला तें पत्र पाहूं द्या. " महंमदतकीनें पुन्हां तें पत्र दलिनीच्या हातीं दिलें. तिनें तें पत्र चांगलें लक्षपूर्वक पाहिलें आणि तें खोटें अगर बनावट नाहीं अशी तिची खात्री झाल्यावर ती ह्मणाली " कोठें आहे विष ? "

" कोठें आहे विष ? " हे शब्द ऐकून महंमदतकी विस्मित झाला आणि ह्मणाला " विष कशाकरितां ? "

**दलिनी**—त्या पत्रांत काय हुकुम आहे ?

**महंमद्**—आपल्याला विष देण्याचा.

**दलिनी**—कोठें आहे तर मग विष ?

**महंमद्**—मग आपण विषपान करणारच कीं काय ?

**दलिनी**—आपल्या राजाचा हुकुम कसा मोडूं ?

महंमदतकी लज्जेनें अगदीं खाक झाला. आणि ह्मणाला " व्हावयाचें तें होऊन गेलें. आपणाला विषपान करण्याची जरूर नाहीं. मी कांहीं तरी उपाय काढितों."

दलिनीच्या नेत्रांतून अग्नीच्या ठिणग्या निघूं लागल्या. ती उभी राहून ह्मणाली " जो तुझ्यासारख्या अधमाकडून प्राणदान घेईल तो तुझ्याहूनही नीच समजला जाईल. आण लवकर विष. "

महंमद तकी दलिनीकडे पाहून ह्मणाला " अहाहा, ही किती तरी सुंदर ! किती तरी ज्वान ! जसा काय तारुण्याचा पाऊस पडून हिच्या लावण्यनदीला पूर लोटला आहे. जणुं काय वसंताच्या पहिल्या बहरांत अंगप्रत्यंग पुष्पमुकुलाप्रमाणें विकसित झालें आहे. वसंत आणि वर्षा ह्या दोन ऋतूंचा येथें संगम झाला आहे. माझ्या पाहण्यानें तिला अनिवार दुःख होतें आहे, पण तिच्या पाहण्यानें मला अत्यंत सुख होतें आहे. हे परमेश्वरा, तिचें दुःख देखील इतकें रमणीय केलेंस हें काय तुझें कौशल्य ? ही दुःखविव्हल बाला वात्याहत प्रफुल्ल पुष्पाप्रमाणें किंवा तरंगताडित प्रमोदनौकेप्रमाणें दिसते आहे. हिला घेऊन मी काय करूं ? कोठें ठेवूं ? सैतानानें तकीचे कानांत सांगितलें " हृदयांत ठेव. "

तकी ह्मणाला " सुंदरी, ऐक माझें. माझा स्वीकार कर. विषपान करण्याची जरूर नाहीं. "

तें ऐकून दलिनीनें महंमद तकीला लाथ मारिली.

महंमदतकीकडून दलिनीला विष दिलें गेलें नाहीं. तो दलिनीकडे पहात पहात निघून गेला.

नंतर दलिनी जमिनीवर लोळण घेऊन रडूं लागली. व ह्मणाली " हे राजराजेश्वर, शाहानशाहा, ह्या गरीब दासीला आपण काय हा हुकूम सोडला ! विषपान करूं ? आपला हुकूम झाल्यावर कां विषपान करणार नाहीं ? आपली कृपा ही मला अमृत आहे व आपला क्रोध हें विष आहे. आपला मजवर राग झाला तेव्हांच मीं विषपान केलें. आपल्या रागापुढें विषपानाच्या यातना अधिक आहेत कीं काय ? हे राजाधिराज, जगत्प्रदीप, दयासागर, ईश्वराचे प्रतिनिधि, तुह्मी कोठें आहां ? आपल्या आज्ञेनें मी हांसत हांसत विषपान करीन. पण आपण पाहण्याला येथें नाहीं ह्याचें मला मनस्वी दुःख वाटतें. "

करीमन् नामक एक दासी दलिनीच्या शुश्रुषेकरितां तिजजवळ होती. तिला हांक मारून दलिनीनें आपले सर्व अलंकार तिजजवळ दिले आणि ती ह्मणाली " मुकाट्यानें एखाद्या हकिमाकडे जा आणि ज्याच्या योगानें मला अक्षयीची निद्रा लागेल असें एखादें औषध घेऊन ये. हे दागिने विकून त्या औषधाची किंमत दे आणि बाकी जें काय उरेल तें तूं घे.

करिमन् दलिनीचा हेतु समजली. प्रथम तिनें ती गोष्ट करण्याचें नाकारिलें. पण दलिनीचा अति आग्रह पाहून व द्रव्याच्या लोभाला गुंतून तिनें कबूल केलें. हाकिमानें औषध दिलें. एका जासुदानें गुप्तपणें महंमदतकीला इतकीच बातमी कळविली कीं, आज करीमन् दासीनें मिरजाहबीब हकिमापासून विष विकत नेलें आहे.

महंमदतकीनें करिमनला आणून विचारिलें. ती ह्मणाली " मी विष आणून दलिनीला दिलें. "

तें ऐकतांच महंमदतकी दलिनीकडे आला. त्यानें पाहिलें तों दलिनी वर दृष्टि लावून हात जोडून बसली आहे, तिच्या विस्फारित कमललोचनांपासून अश्रूंच्या धारांवर धारा वहात आहेत आणि समोर एक रिकामें पात्र पडलें आहे—दलिनीनें विषप्राशन केलें होतें.

महंमदतकीनें विचारिलें " हें कसलें पात्र पडलें आहे ? "

दलिनी ह्मणाली " विषपात्र. मी तुझ्यासारखी निमकहराम नाहीं. मी प्रभूची आज्ञा पालन केली आहे. शिलक उरलेलें विष पिऊन तूंही मजबरोबर चल. हेंच तुला उचित आहे. "

महंमदतकी स्तब्ध उभा राहिला. हळू हळू दलिनी निजली. तिचे डोळे मिटले. सर्व अंधार झाला. दलिनीचें प्राणोत्क्रमण झालें.

## तृतीय परिच्छेद.

### राजा व रंक.

काटोया येथील लढाईंत पराभव पावून मीरकासिमाचें सैन्य मागें हटलें. त्या पराभूत सैन्याचा गिरियाच्या लढाईत पुन्हां पराजय झाला. इंग्रजांच्या शौर्यानें नबाबाच्या सैन्याची, वायुपुढें जशी धुळीची अवस्था होते तद्वत् अवस्था झाली. शिलक राहिलेलें सैन्य उदय-नालाच्या किल्ल्याचा आश्रय धरून राहिलें. त्या ठिकाणीं सभोंवार खंदक खणून तें इंग्रजसैन्याला थोडा बहुत त्रास देत होतें.

स्वतः मीरकासीम तेथें आला. तो आल्यावर सय्यद अमीर हुसेननें त्याला सांगितलें कीं, एक कैदी आपल्या भेटीविषयीं फार उत्सुक झाला आहे. त्याच्या मनांतून आपणांला कांहीं एक विशेष गोष्ट सांगावयाची आहे.

मीरकासिमानें विचारिलें " तो कोण ? "

अमीर हुसेन ह्मणाला " तीं एक स्त्री आहे. ती कलकत्त्याहून आली आहे. वॉरन् हेस्टिंगनें पत्र देऊन तिला पाठविलें आहे. वास्तविक ती कैदी नाहीं. ती युद्धाचे पूर्वी पत्र घेऊन आली ह्मणून मीं पत्र स्वीकारलें. दासाच्या हातून जर कांहीं गुन्हा झाला असेल तर बंदा हाजिर आहे. " असें बोलून अमीर हुसेनानें नबाबाला तें पत्र पाचून दाखविलें.

वॉरन हेस्टिंगनें लिहिलें होतें " ही स्त्री कोण, तें मला माहीत नाहीं. ती एक दिवस घाबरून मजकडे आली आणि विनंति करून ह्मणाली ' मी येथें अगदीं निःसहाय आहे. आपण दया करून मला नबाबाकडे पाठविलें तर मजवर मोठे उपकार होतील ' इत्यादि. आपल्या-शींच आमचें युद्ध सुरू झालें आहे हें खरें. पण आमचें भांडण स्त्रीयांशीं नाहीं. ह्मणून हिला आपल्याकडे पाठविली आहे. ह्या शिवाय हिची कांहीं एक माहिती आह्मांला नाहीं. "

पत्र ऐकून झाल्यावर नबाबानें त्या स्त्रीला समोर घेऊन येण्यास सांगितलें. अमीर हुसेन तिला घेऊन आला. नबाबानें पाहिलें तों ती कुल्सम्.

नबाब रागावून ह्मणाला " दुष्टे, तुला काय पाहिजे ? " शांत दृष्टीनें नबाबाकडे पाहून कुल्सम ह्मणाली " नबाब साहेब, तुमची बेगम कोठें आहे ? दुलिनी बीबी कोठें आहे ? " कुलसमची ही वाक्यप्रणाली पाहून अमीर हुसेन घाबरला आणि तेथून निघून गेला.

मीरकासीम ह्मणाला " जेथें ती पापिष्टा गेली आहे तेथें तुलाही लवकरच पाठवितों. "

कुलसम् ह्मणाली " आपण व मी बरोबरच जाऊं. त्याचकरितां मी आपणांकडे आलें आहें. दुलिनीनें आत्महत्त्या केल्याचें मला आतांच समजलें. खरें का तें ? "

**नबाब**—आत्महत्त्या कसली ! राजाच्या हुकमानें ती मेली. तूंही तिचीच साथीदार. लवकरच तूंही कोल्ह्या कुत्र्यांच्या भक्ष्यस्थानीं पडशील.

कुलसम् घाबरली आणि तोंडास येतील त्या शिव्या नबाबाला देत सुटली. तें ऐकतांच शिपाई, उमराव, नौकर व पहारेकरी चोहोंकडून धांवत आले व त्यांपैकीं एक तिला धरण्यास जाऊं लागला. पण नबाबानें त्यांचा निषेध केला. तो आश्चर्यचकित होऊन मागें सरला. नंतर कुलसम् ह्मणाली " आपण सर्वजण आलां हें चांगलेंच झालें. मी आपल्याला एक अपूर्व गोष्ट सांगतें ती ऐका. लवकरच माझ्या वधाची आज्ञा होईल आणि मी मेलें ह्मणजे माझी गोष्ट तशीच राहील. ह्मणून ती आतांच ऐका. "

" बंगाला व बहार प्रांताचा मीरकासीम नांवें एक मूर्ख नबाब आहे. दुलिनी नामक त्याची बेगम होती. ती नबाबाचा सेनापति जो गुरगनखां त्याची बहीण. "

तें ऐकून मग कोणीही कुल्समच्या आंगावर धांवलें नाहीं. सर्वजण एकमेकांच्या तोंडाकडे पहात राहिले. सर्वांनाच मोठें आश्चर्य वाटलें. नबाबही कांहीं बोलला नाहीं. कुल्सम पुन्हां बोलूं लागली.

" गुरगनखां व दौलतउन्नेसा हीं दोघेंजण आपसांत संकेत करून इस्पहान् येथून नोकरीच्या इराद्यानें बंगाल्यांत आलीं. दलिनीचा जेव्हां मीरकासीमच्या जनानखान्यांत प्रवेश झाला तेव्हां परस्परांनीं परस्पराचें कल्याण करण्याची प्रतिज्ञा केली. "

नंतर कुलसमनें ज्या रात्रीं त्या दोघीजणी गुरगनखाच्या हवेलीवर गेल्या होत्या त्या रात्रीची सर्व इत्थंभूत हकिकत सांगितली. गुरगनखांशीं दलिनीचें काय काय भाषण झालें तेंही सांगितलें. नंतर तेथून परत येणें, किल्यांत शिरण्याची बंदी, ब्रह्मचाऱ्याचें साहाय्य, प्रतापाच्या गृहीं वास, इंग्रजांनीं तेथें केलेला प्रळय, शैवलिनी समजून दलिनीचें हरण, नौकेवरील बंदिवास, आमिएट वगैरे साहेबांचा मृत्यु, फॉष्टरबरोबर आपलें पलायन व शेवटीं फॉष्टरचें दलिनीला गंगातीरीं सोडून देणें ह्या सर्व गोष्टी तिनें सांगितल्या आणि ती ह्मणाली:—

" त्या वेळीं खरोखर मला पिशाचबाधा झाली होती, ह्यांत शंका नाहीं. नाहींतर मी बेगमेला कशी सोडतें? तो पापी इंग्रज मोठ्या दुःखांत आहे असें पाहून मी मनांत विचार केला—पण जाऊं द्या त्या गोष्टी—मागून आपल्या लोकांची नौका येत आहे, तीवरील लोक बेगमेला आपल्या नौकेंत घेतील असें मला वाटलें. नाहींतर मी तिला सोडलें असतें ? पण त्याबद्दलचें योग्य शासन मला मिळालें. बेगम गेल्यावर थोड्या वेळानें मी फॉष्टरची विनवणी केली कीं मलाही तीरावर सोडून दे. पण त्यानें सोडून दिलें नाहीं. मग कलकत्त्यास गेल्यावर जो कोणी इंग्रज मला भेटे त्याची " मला परत पाठवा " अशी मी विनवणी करी. पण कोणींही माझी विनंति मान्य केली नाहीं. नंतर हेस्टिंग साहेब मोठा दयाळू आहे असें ऐकून मी त्याजजवळ गेलें आणि त्याचे पाय धरले—त्याच्याच कृपेनें मी येथें आलें. आतां तुह्मी खुशाल मला मारून टाका. माझी आतां जगण्याची इच्छा नाहीं. "

असें बोलून कुलसम रडूं लागली.

बहुमूल्य रत्नखचित सिंहासनाधिपति तो बंगाल्याचा नवाब पण त्यानें मान खालीं घातली. त्या बृहत्साम्राज्याचा राजदंड त्याच्या हातांतून स्खलित होण्याच्या बेतांत आला. पण तें अजेय राज्य देखील कोठें गेलें? बंगाल्याचा नबाब मूर्ख हें जें कुलूसमूनें सांगितलें तें खरें आहे.

नवाब उमरावांना उद्देशून ह्मणाला " ह्या राज्याचें रक्षण आतां माझ्या हातून होत नाहीं. बंगाल्याचा नबाब मूर्ख आहे असें जें ह्या दासीनें सांगितलें तें सत्य आहे. आतां हें राज्य तुह्मी संभाळा. मी चाललों. मी रुहिदास गडावर जाऊन जनानखान्यांत दडून राहतों अगर फकिरी पतकरतों. " बोलतां बोलतां नबाबाचें शरीर प्रवाहांतील लव्हाळ्याप्रमाणें थरथर कांपत होतें. डोळ्याचें पाणी पुसून मीरकासीम पुन्हां बोलूं लागला " बंधुगणहो, ऐका. जर मला सुराजउद्दौल्याप्रमाणें इंग्रजांनीं अगर त्यांच्या शिपायांनीं मारून टाकलें तर माझी तुह्मांला एवढीच प्रार्थना आहे कीं, माझी कबर दलिनीच्या कबरेजवळच बांधा. आतां माझ्यानें जास्त बोलवत नाहीं. तुह्मी जा. पण माझें आणखी एक काम करा—महंमद तकीची व माझी एकवार भेट करवा. " नबाबानें अलि इभ्राहिमखां, अशी हांक मारली. इभ्राहिमखानानें ओ दिली. नबाब त्याला ह्मणाला " ह्या सर्व जगांत तुझ्यासारखा मला दुसरा मित्र नाहीं. तुजजवळ माझी एवढीच विनंति आहे—तकीखांला एक वेळ मजकडे घेऊन ये. "

इभ्राहिमखां नबाबास मजुरा करून तंबूबाहेर आला आणि घोड्यावर स्वार झाला.

नंतर नबाब ह्मणाला " आणखी कोणी मजवर कांहीं उपकार करील काय ? "

सर्वजण हात जोडून हुकमाची वाट पाहत राहिले. नबाब ह्मणाला " फॉष्टरला कोण येथें आणूं शकेल ? "

अमीर हुसेन ह्मणाला " तो कोठें आहे त्याचा तपास करण्याकरितां मी कलकत्त्यास जातों. "

नबाब थोडा विचार करून ह्मणाला " ती शैवलिनी कोण आहे ? तिला कोण घेऊन येईल ? "

महंमद इरफान् हात जोडून ह्मणाला " ती आतां स्वदेशीं आली असेल. मी तिला घेऊन येतों. " असें ह्मणून महंमद इरफान् तेथून निघाला.

त्यावर नबाब ह्मणाला. " ज्या ब्रह्मचाऱ्यानें दलिनीला मोंगिरास आश्रय दिला होता, त्याला कोण घेऊन येईल ? "

महंमद इरफान् जातां जातां पुन्हां ह्मणाला " जर हुजूरची आज्ञा होत असेल तर शैवलिनीचा शोध लावल्यावर त्याच्या शोधार्थ मी मोंगिरास जाईन. "

शेवटीं नबाब ह्मणाला " गुरगनखां येथून किती दूर आहे ? "

उमरावांनीं सांगितलें " तो फौज घेऊन उदयनालास येणार आहे असें ऐकतों पण अद्याप तेथें पोंचला नाहीं. " नबाब मृदु स्वरानें ह्मणाला " फौज ! फौज ! कोणाची फौज ! ! "

एकजण हळूच ह्मणाला " त्याची. "

सर्व उमराव निघून गेले. नंतर नबाब रत्नखचित सिंहासनावरून खालीं उतरला. डोक्यावरील मुकुट व अंगावरील सर्व जड जवाहीर त्यानें फेंकून दिलें व जमिनीवर पडून " दलिनी ! दलिनी ! " असें ह्मणून रडूं लागला.

**ह्या संसारांत नबाबी ही अशी आहे !**



# चतुर्थ परिच्छेद.

——:O:——

## जॉन स्टॅल्कार्ट.

कुलसमची वॉरन हेस्टिंगशीं भेट झाली होती हें मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. तिनें आपली हकिकत सांगतां सांगतां फॉष्टरचीही सर्व हकिकत सांगितली.

वॉरन् हेस्टिंग परपीडक होता असें इतिहासावरून कळतें. उद्योगी पुरुषांना कधीं कधीं परपीडक व्हावें लागतें. ज्यावर राज्यरक्षणाचा भार असतो तो स्वतः जरी दयालु व न्यायतत्पर असला तरीही राज्यरक्षणाकरितां प्रसंगविशेषीं त्याला परपीडन करावें लागतें. एक दोन जणांना शिक्षा दिल्यानें जर शेंकडों लोकांचें कल्याण होत आहे तर ती शिक्षा देणें अवश्य कर्तव्य आहे असें राज्यकर्ते समजतात. वस्तुतः वॉरन् हेस्टिंगप्रमाणें ज्यांच्या अंगीं राज्यसंस्थापनाचें कर्तृत्व आहे ते दयालु व न्यायनिष्ठ नाहींत हें ह्मणणें चुकीचें आहे. ज्यांच्या अंतःकरणांत दया व न्यायपरता नाहीं त्यांच्या हातून राज्यसंस्थापनेसारखें महत्कृत्य होणें नाहीं—कारण त्यांचा स्वभाव उन्नत नव्हे—क्षुद्र. क्षुद्रस्वभावाच्या माणसांच्या हातून महत्कृत्यें कधींही होणार नाहींत.

वॉरन्‌हेस्टिंग दयालु व न्यायनिष्ठ होता. त्यावेळीं तो गव्हरनर झाला नव्हता. कुलसमची रवानगी केल्यावर तो फॉष्टरच्या तरतुदीस लागला. त्यानें पाहिलें तों फॉष्टर अगदीं पीडित होऊन पडलेला. प्रथमतः त्यानें त्याच्या रोगाची चिकित्सा करविली. चांगल्या औषधोपचारानें फॉष्टर लवकरच बरा झाला.

त्यानंतर वॉरन् हेस्टिंगनें फॉष्टरच्या अपराधाची चौकशी केली. घाबरून जाऊन फॉष्टरनें सर्व अपराध कबूल केला. कौन्सिलामध्यें वाटाघाट करून त्यानें फॉष्टरला पदच्युत केलें. फॉष्टरला कौन्सिलसमोर आणून त्याची चौकशी करण्याचें हेस्टिंगच्या मनांत होतें. पण साक्षीदा-

रांचा कांहीं ठिकाण नाहीं व स्वतः फॉष्टरलाही त्याच्या अपराधाचें बरेंच प्रायश्चित्त मिळालें आहे असें पाहून त्यानें तो नाद सोडून दिला.

फॉष्टरला हें समजलें नाहीं. तो क्षुद्रबुद्धीचा होता. आपल्याला यःकश्चित् अपराधाबद्दल फार मोठी शिक्षा मिळाली असें त्याच्या क्षुद्र बुद्धीला वाटलें. अपराधी लोकांच्या स्वभावाप्रमाणें तो आपल्या प्रभूं-वर फार संतापला व त्यांच्याशीं वैर करण्याचा त्यानें संकल्प केला.

डाईस संबर ह्या नांवाचा एक स्विस् अगर जर्मन मनुष्य मीरकासिमाच्या सैन्यांत अधिकारी होता. हाच पुढें समरू या नांवानें प्रख्यातीस आला. समरू उदयनाला येथें यवनशिबिरांत सैन्य घेऊन आला. तेथें फॉष्टर त्याच्याजवळ गेला. प्रथमतः त्यानें समरूकडे एक दूत पाठविला. ह्याच्याद्वारें इंग्रजांच्या गुप्त मसलती आपल्याला समजतील असें समजून समरूनें त्याला आपल्याजवळ ठेवून घेतलें. जॉन स्टॅल्कर्ट हें खोटें नांव धारण करून फॉष्टर समरूच्या शिबिरांत राहिला. अमीर हुसेन ज्यावेळीं फॉष्टरच्या शोधास निघाला त्यावेळीं फॉष्टर समरूच्या तंबूत होता.

अमीर हुसेनानें कुलसमला योग्य ठिकाणीं नेऊन ठेविलें आणि नंतर तो फॉष्टरच्या शोधार्थ निघाला. एक इंग्रज मुसलमानांच्या सैन्यांत येऊन भरती झाला आहे व तो समरूच्या शिबिरांत आहे असें त्याला नोकर लोकांकडून समजलें. अमीर हुसेन समरूच्या शिबिरांत गेला.

अमीर हुसेन जेव्हां समरूच्या तंबूत शिरला तेव्हां समरू व फॉष्टर कांहीं बोलत बसले होते. अमीर हुसेन येऊन बसल्यावर समरूनें जॉन स्टॅल्कर्टची हकीकत त्याला सांगितली. अमीर हुसेन स्टॅल्कर्ट-बरोबर संभाषण करूं लागला.

इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर अमीर हुसेनानें स्टॅलकर्टला विचारिलें “ लॉरेन्स फॉष्टर साहेबाला आपण ओळखतां काय? ”

फॉष्टरचा चेहरा काळा पडला. त्यानें मान खालीं घालून उत्तर दिलें “ लॉरेन्स फॉष्टर ? मला मुळींच माहीत नाहीं. ”

अमीर हुसेनानें पुन्हां विचारलें " बरें पण त्याचें नांव तरी कधीं ऐकिलें आहे काय ? "

थोडा वेळ थांबून फॉष्टरनें उत्तर दिलें " नांव—लॉरेन्स फॉष्टर—नाहीं कधीं ऐकल्याचें आठवत. "

अमीर हुसेन त्यावर काहीं बोलला नाहीं. पण स्टॅल्कर्ट हा खरें खरें सांगत नाहीं असें त्याला समजून चुकलें. फॉष्टरनें दोन वेळ उठून जाण्याचा प्रयत्न केला पण अमीर हुसेनानें त्याला बसवून ठेविलें. अमीर हुसेनाला वाटलें कीं, ह्याला सर्व माहीत आहे; पण हा सांगत नाहीं.

थोडा वेळ गेल्यावर फॉष्टर आपली टोपी डोक्यावर घालून बसला. हें कृत्य इंग्रज लोकांच्या रीतिरिवाजाविरुद्ध आहे हें अमीर हुसेनाला माहीत होतें. फॉष्टर जेव्हां डोक्यावर टोपी चढवूं लागला तेव्हां त्याच्या डोक्यावर लागलेल्या जखमेकडे अमीर हुसेनची दृष्टि गेली. स्टॅलकर्टनें कशाकरितां बरें डोक्यावर टोपी ठेविली असावी ?

अमीर हुसेन निघून गेला. आपल्या तंबूंत येऊन त्यानें कुलसमला हांक मारिली आणि तो ह्मणाला " माझ्या बरोबर चल. " कुलसम त्याजबरोबर गेली.

कुलसमला घेऊन अमीरहुसेन पुन्हां समरूच्या तंबूंत गेला. कुलसम बाहेरच उभी राहिली. फॉष्टर अद्यापिही तेथेंच बसला होता. अमीरहुसेन समरूला ह्मणाला " आपली अनुमति असेल तर माझी एक दासी आपणांला मुजरा करील. कांहीं महत्वाचें काम आहे. "

समरूनें अनुमति दिली. फॉष्टरचें काळीज धडधडूं लागलें. तो खुर्चीवरून उठला. पण अमीर हुसेनानें त्याचा हात धरून त्याला खालीं बसविलें व कुलूसमला हांक मारिली. कुलसम आली व फॉष्टरलाँ पाहून स्तब्ध उभी राहिली.

अमीरहुसेनानें कुलसमला विचारिलें " हा कोण ? " कुलसम ह्मणाली " लॉरेन्स फॉष्टर. "

अमीरहुसेनानें फॉष्टरचा हात पकडला. फॉष्टर ह्मणाला " मीं काय केलें ? "

त्याच्या प्रश्नाचें उत्तर न देतां अमीरहुसेन समरूला ह्मणाला " साहेब, ह्याला पकडण्याविषयीं नबाब नाजिमांचा हुकुम आहे. आपण मजबरोबर शिपाई द्या. ते ह्याला घेऊन चलतील. "

समरू विस्मित झाला. त्यानें विचारलें " काय हकीकत आहे ? "

अमीर हुसेन ह्मणाला " पुढें सांगेन. " समरूनें शिपाई दिले व अमीर हुसेन फॉष्टरला बांधून घेऊन गेला. "

---

## पंचम परिच्छेद.

### पुन्हां वेदग्राम.

चंद्रशेखर मोठ्या कष्टानें शैवलिनीला घेऊन स्वदेशीं आला. फार दिवसांनीं तो घरांत शिरला. आंत जाऊन पाहतो तों घर अरण्याप्रमाणें भयंकर झालेलें. कौलाघराला पांजरण नव्हतें व तें बहुतेक वाऱ्यानें उडून गेलें होतें व कांहीं पडून गेलें होतें. वांसे, कळक वगैरे शेजारी पाजारी घेऊन गेले होते. अंगणांत तर अगदीं जंगल झालें होतें. त्यांत साप वगैरे यथास्थित वावरत होते. घराचीं दारें चोरांनीं नाहींशीं केलीं होतीं. घर अगदीं उघडें होतें. घरांत सामानसुमान कांहीं नव्हतें. कांहीं चोरांनीं नेलें होतें व कांहीं सुंदरीनें आपल्या घरीं नेऊन ठेविलें होतें. पावसाचें पाणी घरांत शिरल्यामुळें कोठें कोठें ओल आली होती व कोठें कोठें झुडपें उगवलीं होतीं. उंदीर, घुशी व पाकोळ्या घरभर वावरत होत्या. शैवलिनीचा हात धरून व एक दीर्घ निश्वास टाकून चंद्रशेखर त्या घरांत शिरला.

ह्याच ठिकाणीं उभें राहून आपण पुस्तकें जाळलीं याचें त्याला स्मरण झालें. त्यानें " शैवलिनी " अशी हांक मारिली.

शैवलिनीनें उत्तर दिलें नाहीं. दारांत बसून, पूर्वी स्वप्नांत दिसलेल्या करवीराच्या झाडाकडे ती पहात होती. तिनें चंद्रशेखराच्या एकाही प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं—ती टक लावून कशाकडेशीं पहात होती—मधुन मधुन हांसत होती—एक वेळ ती मोठ्यानें हंसली आणि तिनें बोटानें कायसेसें दाखविलें.

चंद्रशेखर शैवलिनीला घेऊन आल्याची बातमी सर्व गांवभर पसरली. पुष्कळ लोक पाहण्यास आले. सर्वांच्या आधीं सुंदरी आली.

शैवलिनी भ्रमिष्ट झाल्याची हकीकत सुंदरीला कळली नव्हती. प्रथम तिनें चंद्रशेखरास प्रणाम केला. तिनें पाहिलें तों चंद्रशेखराचा ब्रह्मचाऱ्याचा वेष. शैवलिनीकडे पाहून ती ह्मणाली " ते हिला घेऊन आले हें चांगलें झालें. फक्त प्रायश्चित्त दिलें ह्मणजे झालें. "

चंद्रशेखर जवळ असतांना शैवलिनी तशीच बसली होती. तिनें तोंडावर पदर देखील घेतला नव्हता व सुंदरीकडे पाहून ती फिदीफिदी हंसत होती. हें पाहून सुंदरीला मोठें आश्चर्य वाटलें. सुंदरी मनांत ह्मणाली "हा कदाचित् इंग्रजी रिवाज शैवलिनी शिकून आली असेल." असा विचार करून ती शैवलिनी पासून थोड्या अंतरावर बसली आणि हंसत हंसत ह्मणाली "कांग ओळख आहे कां ?" शैवलिनी ह्मणाली हो, तूं पार्वतीना ?"

**सुंदरी**— डोंबल तुझें, दोन दिवसांत तूं मला विसरलीस ना ?

**शैवलिनी**—विसरेन कशीग–तूंच माझा भात विटाळून फेंकलास आणि मग मी तुला पुष्कळ शिव्या दिल्या तें विसरेन कशी ? बरं पण पार्वति, एखादें गाणें तर ह्मण पाहूं ?

.( असें ह्मणून ती स्वतःच गाऊं लागली. )

## पद

( चंद्रकांत राजाचीः-या चा. )

**॥ प्रीतितरूचीं विचित्र कुसुमें नयना नच दिसती ॥**
**॥ चित्त चळविती, पित्त खवळिती, सत्ता चालविती ॥ १ ॥**

पार्वति, मला कांहीं बरोबर समजत नाहीं—मला चुकल्यासारखें वाटतें आहे— कांहीं होतें तें नाहींसें झालें आहे—कांहीं येणार होतें तें आलें नाहीं—कोठें आलें आहे तेथें आलें नव्हतें—ज्याला पाहतें आहे त्याची ओळख पटत नाहीं.

सुंदरी विस्मित झाली आणि चंद्रशेखराकडे पाहूं लागली. चंद्रशेखरानें सुंदरीला जवळ बोलाविलें. सुंदरी जवळ गेली आणि त्याच्या कानांत ह्मणाली " वेडी का झाली आहे ? "

सुंदरीला खरी स्थिति समजली. थोडावेळ ती स्तब्ध राहिली. तिच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह वाहूं लागले. ती रडूं लागली. स्त्रीजात ही संसारांतील रत्न आहे. ह्याच सुंदरीनें पूर्वीं एकवेळ शैवलिनी नौकेसहित बुडून मरावी अशी कायामनोवाक्यें परमेश्वराची प्रार्थना केली होती. तीच सुंदरी शैवलिनीची अशी अवस्था पाहून आज धाय मोकलून रडूं लागली.

सुंदरी डोळे पुशीत पुशीत शैवलिनीजवळ जाऊन बसली, हळू हळू तिच्याशीं बोलूं लागली व पूर्वीच्या गोष्टींची तिला आठवण देऊं लागली. पण शैवलिनीला कांहीं आठवेना. शैवलिनीची स्मृति नष्ट झाली नव्हती. तसें असतें तर पार्वतीचें नांव तिला कसें आठवतें ? तिचें चित्त मात्र थाऱ्यावर नव्हतें. तिच्या चित्ताचा गोंधळ होऊन गेला होता. सुंदरीची तिला आठवण होती पण तिची ओळख पटेना.

सुंदरीनें प्रथम चंद्रशेखराला आपल्या घरीं स्नान व भोजन करण्यास पाठविलें व नंतर ती त्या पडित घराच्या दुरुस्तीस लागली. क्रमाक्रमानें शेजारीपाजारीही तेथें मदतीस आले. थोड्याच वेळांत सर्व आवश्यक सामुग्री तेथें येऊन पडली.

इकडे प्रताप मोंगिराहून परत आला. त्यानें आपल्या बरोबरच्या लाठियाल लोकांना यथास्थानीं ठेवून तो घरीं आला होता. घरीं येतांच चंद्रशेखर आल्याची बातमी त्याला कळली. लागलींच तो त्याला भेटण्याकरितां वेदग्रामीं गेला.

त्याच ठिकाणीं रमानंद स्वामींनीं येऊन त्यांना दर्शन दिलें. रमानंद स्वामींच्या सांगण्याप्रमाणें चंद्रशेखर शैवलिनीला औषधोपचार करणार आहे हें ऐकून सुंदरीला मोठा आनंद झाला. औषध सुरू करण्याचा दिवस देखील मुक्रर झाला.

---

## षष्ठ परिच्छेद.

### योगबल कीं Psychic Force !

औषध काय होतें तें आह्मांला माहीत नाहीं. पण तें देण्याकरितां चंद्रशेखर विशेष शुद्धाचरणानें वागत होता. तो जात्याच जितेंद्रिय असल्यामुळें क्षुत्पिपासादि शारीरिक विकारांचा त्याजवर मुळींच पगडा नव्हता. पण सध्या त्यानें निराहार करून राहण्याचें कठोर व्रत पतकरिलें होतें. कित्येक दिवसांपासून त्यानें आपलें मन ईश्वरचिंतनीं लाविलें होतें. पारमार्थिक चिंतेशिवाय अन्य कोणतीही चिंता त्याच्या मनाला नव्हती.

निश्चित वेळीं चंद्रशेखर औषधप्रयोगाचे उद्योगास लागला. शैवलिनीकरितां बिछाना घालण्यास त्यानें सांगितलें. सुंदरीनें ठेवलेल्या दासीनें बिछाना घातला.

चंद्रशेखरानें शैवलिनीस बिछान्यावर निजविण्यास सांगितलें. सुंदरीनें मोठ्या बळजबरीनें तिला निजविलें. कारण शैवलिनी मुकाट्यानें निजण्यास तयार होईना. सुंदरी स्नान करण्यास मात्र रोज घरीं जात असे आणि

बाकी सारा वेळ शैवलिनीच्या शुश्रुषेंत असे. नंतर चंद्रशेखर सर्वांना हांक मारून ह्मणाला " आतां तुह्मी सर्वजण बाहेर जा. मी बोलवीन तेव्हां आंत या. "

सर्वजण बाहेर गेल्यावर चंद्रशेखरानें हातांतलें औषध जमिनीवर ठेविलें आणि तो शैवलिनीला ह्मणाला " उठून बैस पाहूं. "

शैवलिनी हळू हळू गाऊं लागली—उठली नाहीं. चंद्रशेखर तिच्या डोळ्याकडे आपली स्थिरदृष्टि लावून औषधाचा एक एक घोट तिला पाजूं लागला. रमानंद स्वामी ह्मणाले " औषध दुसरें कांहीं नाहीं, केवळ कमंडलूंतलें जल आहे. " चंद्रशेखर ह्मणाला " ह्यानें काय होणार ? " स्वामी ह्मणाले " ह्याच्या योगानें हिला योगबल प्राप्त होईल."

नंतर चंद्रशेखर तिचें ललाट, चक्षु व कपाळ ह्यांच्या जवळ वक्रगतीनें हस्तसंचालन करूं लागला. कांहीं वेळ हा प्रकार चालल्यावर शैवलिनीचे डोळे मिटले व तिला घोर निद्रा आली.

तेव्हां चंद्रशेखरानें " शैवलिनी " अशी हांक मारली.

शैवलिनीनें निद्रावस्थेंतच " काय आज्ञा आहे " असें उत्तर दिलें.

**चंद्रशेखर**—मी कोण ?

शैवलिनी पूर्ववत् निद्रेंतच होती. ती ह्मणाली " माझे पति. "

**चंद्रशेखर**—तूं कोण ?

**शैवलिनी**—शैवलिनी.

**चंद्रशेखर**—हें कोणतें ठिकाण आहे ?

**शैवलिनी**—वेदग्राम—आपलें घर.

**चंद्रशेखर**—बाहेर कोण कोण आहे ?

**शैवलिनी**—प्रताप, सुंदरी आणि इतर लोक.

**चंद्रशेखर**—तूं येथून गेलीस काय ह्मणून ?

**शैवलिनी**—फॉष्टर साहेब घेऊन गेला ह्मणून.

**चंद्रशेखर**—इतके दिवस ह्या सर्व गोष्टींचें तुला स्मरण कसें नाहीं झालें ?

**शैवलिनी**—स्मरण होतें. पण मला ठीक सांगतां येईना.

**चंद्रशेखर**—कां ?

**शैवलिनी**—मला वेड लागलें होतें.

**चंद्रशेखर**—खरें सांगतें आहेस का कांहीं कपट आहे ?

**शैवलिनी**—अगदीं खरें सांगतें आहे, कपट नाहीं.

**चंद्रशेखर**—बरें पण आतां ?

**शैवलिनी**—आतां हें जें स्वप्न—आपल्या कृपेनें मला ज्ञान प्राप्त झालें आहे.

**चंद्रशेखर**—तर खरें सांगशील ?

**शैवलिनी**—हो, सांगेन.

**चंद्रशेखर**—तूं फॉष्टर बरोबर कां गेलीस ?

**शैवलिनी**—प्रतापाकरितां.

चंद्रशेखर विस्मित झाला. शेंकडों कुकल्पना त्याच्या मनांत येऊं लागल्या. त्यानें विचारलें " प्रताप तुझा जार कीं काय ? "

**शैवलिनी**—छे ! छे !

**चंद्रशेखर**—तर कोण ?

**शैवलिनी**—आह्मी दोघें एका देंठाचीं फुलें—एकाच वनांत विकसित झालों होतों—आमची ताटातूट कां केली ?

चंद्रशेखरानें एक दीर्घ सुस्कारा टाकिला आणि विचारलें " ज्या दिवशीं प्रताप म्लेंच्छांच्या नौकेवरून पळाला त्या दिवशीच्या गंगेतल्या पोहण्याची तुला आठवण आहे ? "

**शैवलिनी**—आहे.

**चंद्रशेखर**—त्यावेळीं काय काय बोलणें झालें ?

शैवलिनीनें थोडक्यांत सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून चंद्रशेखरानें मनांतल्या मनांत प्रतापाला पुष्कळ धन्यवाद दिले आणि तो ह्मणाला " तर मग तूं फॉष्टर जवळ कां राहिलीस ? "

**शैवलिनी**—राहिलें एवढेंच. पुरंदरपुराला जर कदाचित्‌ गेलें तर प्रताप भेटेल या हेतूनें.

**चंद्रशेखर**—' राहिलें एवढेंच ' असें ह्मणतें आहेस. तर तूं अजूनही पतिव्रता आहेस काय ?

**शैवलिनी**—मीं मनानें प्रतापाला आत्मा समर्पण केल्यामुळें पतिव्रता नाहीं—महा पापिष्टा.

**चंद्रशेखर**—त्या शिवाय ?

**शैवलिनी**—पूर्ण पतिव्रता.

**चंद्रशेखर**—फॉष्टरसंबंधानें ?

**शैवलिनी**—कायामनोवाक्यें.

चंद्रशेखर थोडा रागाचा आविर्भाव आणून ह्मणाला " खरें सांग. "

त्या निद्रित युवतीनें किंचित भिंवया चढविल्या आणि उत्तर दिलें " अगदीं खरें सांगतें आहे. "

चंद्रशेखर पुन्हां एक दीर्घ निश्वास टाकून ह्मणाला " ब्राह्मणकन्या असून तूं आपली जात घालवायला त्याजकडे कशी गेलीस ? "

**शैवलिनी**—आपण सर्वशास्त्रज्ञ आहां. आपणच सांगा मी जातिभ्रष्ट झालें कीं काय ? मी त्यांचें अन्न खाल्लें नाहीं.—त्यांच्या हातचें पाणी देखील प्यालें नाहीं. प्रतिदिवशीं मी स्वहस्तानें अन्न तयार करून खात होतें. माझ्या तैनातीस हिंदु परिचारिका दिलेल्या होत्या. त्यांच्याबरोबर एकाच नौकेंत राहिलें होतें हें खरें—पण गंगेच्या पात्रांत.

चंद्रशेखर मान खालीं करून बसला—त्यानें मनाशीं पुष्कळ विचार केला आणि तो ह्मणाला " हाय ! हाय ! केवढा मी क्रूरकर्मा ! स्त्रीहत्या करण्यास उद्युक्त झालों अं ? " थोडा वेळ गेल्यावर त्यानें पुन्हां प्रश्न केला " आजपर्यंत ही हकीकत कोणालाच कशी सांगितली नाहींस ? "

**शैवलिनी**—माझें सांगणें कोण खरें मानील ?

**चंद्रशेखर**—ही सर्व हकीकत दुसऱ्या कोणाला ठाऊक आहे ?

**शैवलिनी**—फॉष्टर व पार्वती ह्यांना ठाऊक आहे.

**चंद्रशेखर**—पार्वती कोठें आहे ?

**शैवलिनी**—ती मोंगीर येथें मेली. एक महिना झाला.

**चंद्रशेखर**—फॉष्टर कोठें आहे ?

**शैवलिनी**—उवयनाला येथें नबाबाचे शिबिरांत.

थोडावेळ विचार करून चंद्रशेखरानें पुन्हां विचारलें " तुझ्या रोगाचा परिणाम काय होईल—माहीत आहे ?"

**शैवलिनी**—आपण आपलें योगबल मला दिलें आहे—त्यावरून मला समजतें आहे कीं, आपल्या कृपेनें व औषधानें मला पूर्ण आरोग्य प्राप्त होईल.

**चंद्रशेखर**—आरोग्य प्राप्त झाल्यावर कोठें जायची इच्छा आहे ?

**शैवलिनी**—विष मिळालें तर पिईन—पण नरकाची भीति वाटते.

**चंद्रशेखर**—मरण्याची इच्छा कां ?

**शैवलिनी**—ह्या संसारांत मला आतां दुसरें स्थान कोणतें ?

**चंद्रशेखर**—माझें घर.

**शैवलिनी**—आपण पुन्हां माझा अंगिकार कराल ?

**चंद्रशेखर**—जर केला ?

**शैवलिनी**—तर कायावाचामनेंकरून आपली पदसेवा करीन.

इतक्यांत घोड्यांच्या टापांचा ध्वनि कानीं आला. त्यावर चंद्रशेखर ह्मणाला " तुला प्राप्त झालेलें योगबल माझें नव्हें—रमानंद स्वामींचें आहे—सांग तर मग हा कसला ध्वनि आहे ?"

**शैवलिनी**—घोड्यांच्या टापांचा शब्द.

**चंद्रशेखर**—कोण येतें आहे ?

**शैवलिनी**—नबाबाचा सैनिक महंमद इरफान्.

**चंद्रशेखर**—कशाला येतो आहे ?

**शैवलिनी**—मला घेऊन जाण्याकरितां. मला पाहण्याची नबाबाला इच्छा झाली आहे.

**चंद्रशेखर**—फॉष्टर तेथें गेल्यावर नबाबाला तुला पाहण्याची इच्छा झाली कीं त्याच्या पूर्वी ?

**शैवलिनी**—नाहीं. दोघांनाही आणण्याविषयीं त्यानें एकदमच हुकुम दिला आहे.

**चंद्रशेखर**—कांहीं चिंता नाहीं, नीज तूं आतां.

असें सांगून चंद्रशेखरानें सर्वांना हांक मारिली. ते आल्यावर चंद्रशेखरानें त्यांना सांगितलें कीं " हिला झोप लागली आहे. जागी झाली ह्मणजे हें भांड्यांतलें औषध हिला द्या. सध्यां, नबाबाचे शिपाई येताहेत, ते उद्यां हिला नबाबाकडे घेऊन जातील. तुह्मी हिच्या बरोबर जा."

सर्वजण विस्मित व भयभीत झाले. त्यांनीं चंद्रशेखराला विचारलें " कशाकरितां हिला नबाबाकडे घेऊन जाणार ? " चंद्रशेखर ह्मणाला " तें आतांच कळेल. भिऊं नका. "

महंमद इरफान येऊन पोंचल्यावर प्रताप त्याच्या स्वागतार्थ पुढें झाला. चंद्रशेखरानें आद्योपांत सर्व हकीकत रमानंद स्वामीस कळविली. रमानंद स्वामी ह्मणाले " उद्यां आपणा दोघांनाही नबाबाचे दरबारीं गेलें पाहिजे. "

---

## सप्तमपरिच्छेद.

### दरबारांत.

एका भव्य तंबूत बंगालचा शेवटचा नबाब बसला होता. शेवटचा ह्मणण्याचें कारण इतकेंच कीं, मीरकासिमानंतर जे बंगालचे नबाब झाले त्यांच्या हातीं सत्ता मुळींच नव्हती.

नबाब कासीम अलीखाँ अंगावर हिरे मोत्यांचे दागिने घालून व मुगुटावर महा मूल्यवान शिरपेच बांधून रत्नखचित सुवर्ण सिंव्हासनावर विरा-

जमान झाला होता. त्याच्या बाजूला भृत्यवर्ग हात जोडून उभा होता. व अमीर उमराव वीरासन घालून नबाबाच्या आज्ञेची वाट पहात होते. नबाबानें विचारिलें " बंदिवान हजर आहेत ? "

महंमद इरफान् ह्मणाला " सर्व हजर आहेत. " नबाबानें प्रथम लॅारेन्स फॅाष्टर ह्याला बोलावण्यास सांगितलें.

लॅारेन्स फॅास्टर समोर येऊन उभा राहिला. नबाबानें विचारिलें " तूं कोण ? "

आतां कांहीं सुटकेचा मार्ग नाहीं असें पाहून लॅारेन्स फॅाष्टर मनाशीं ह्मणाला " हावेळपर्यंत मी इंग्रज ह्या नांवाला कालिमा लावला—पण आतां इंग्रजाप्रमाणें मरावयाचें. "

" माझें नांव लॅारेन्स फॅास्टर. "

**नबाब**—तुझी जात कोण ?

**फॅाष्टर**—इंग्रज.

**नबाब**—इंग्रज ह्मणजे आमचे शत्रु. शत्रु असून तूं आमच्या शिबिरांत कां आलास ?

**फॅाष्टर**—आलों ह्याबद्दल आपल्याला वाटेल तें पारिपत्य करा—मी आपल्या हातीं सांपडलों आहे. कां आलों तें विचारण्याची जरूर नाहीं व आपण जरी विचारिलें तरी मजकडून उत्तर मिळणार नाहीं.

नबाब न रागावतां हासला. आणि ह्मणाला " तूं मोठा शूर आहेस हें मला कळून आलें. खरें बोलशील ? "

**फाष्टर**—इंग्रज कधींच खोटें बोलत नाहीं.

**नबाब**—बरें, तें पाहतां येईल. चंद्रशेखर हजर आहे ह्मणून कोणीं सांगितलें ? हजर असेल तर त्याला घेऊन या.

महंमद इरफान् चंद्रशेखरास घेऊन आला. नबाब चंद्रशेखराकडे पाहून ह्मणाला " हा ओळखीचा आहे कां ? "

**फॅाष्टर**—नांव ऐकलें आहे. पण ओळख नाहीं.

**नबाब**—बरें, कुल्सम कोठें आहे ?

कुल्समही हजर झाली.

नबाबानें फॉष्टरला विचारलें " हिला ओळखतोस ? "

**फॉष्टर**—ओळखतों.

**नबाब**—ही कोण ?

**फॉष्टर**—आपली दासी.

**नबाब**—महंमद तकीला घेऊन या.

नंतर महंमद इरफान् तकीला घेऊन आला.

कोणत्या पक्षाला जाऊन मिळावें ह्याबद्दल तकीखानाचा आजवर ठाम निश्चय झाला नव्हता ह्मणून तो कोणत्याच पक्षाला मिळाला नव्हता. पण तो अविश्वासी आहे असें समजून नबाबाच्या सेनापतींनीं त्याजवर चांगली नजर ठेविली असल्यामुळें अली इब्राहिमखानाला त्याला सहज धरतां आलें.

नबाब तकीखांकडे न पाहतां ह्मणाला " कुलसम, तूं मोंगिराहून कलकत्त्यास कशी गेलीस तें सविस्तर सांग.

कुलसमनें आपली व दलिनीची सर्व हकीकत सांगितली. नंतर ती हात जोडून व डोळ्यांत आंसवें आणून ह्मणाली " जहापन्हा, माझी ह्या पापिष्ट स्त्रीघातकी महंमद तकीवर ह्या आम दरबारापुढें फिर्याद आहे. ह्या दुष्टानें आपल्या प्रभुपत्नीच्या नांवाला वृथा कलंक लावून आपल्या प्रभूशीं प्रवंचना केली व स्त्रीरत्नसार दलिनी बेगमेची अकारण हत्या केली. तर हुजुरांनीं ह्या नराधमाला योग्य शिक्षा द्यावी. "

महंमद तकी घाबरून ह्मणाला " ही खोटी गोष्ट—ह्याला कोण साक्षीदार आहे ? "

कुलसम ओरडून ह्मणाली " ह्याला साक्षी ! आकाशाकडे पहा—ह्याचा साक्षी परमेश्वर ! आपल्या छातीवर हात ठेवून पहा—ह्याचा साक्षी तूं. आणखी कोणी साक्षी पाहिजे असेल तर ह्याच फिरंग्याला विचार. "

नबाब—कायरे ए फिरंगी, कुलसम सांगते आहे तें सर्व खरें आहे ? तूंही आमिएटबरोबर होतास व इंग्रज कधींही खोटें बोलत नाहींत.

फॉष्टरनें ठाऊक असलेली सर्व हकीकत सांगितली. त्यावरून सर्वांची खात्री झाली कीं, दलिनी निरपराधी आहे. महंमदतकी खालीं मान घालून उभा राहिला.

नंतर चंद्रशेखर थोडा पुढें येऊन ह्मणाला "धर्मावतार, कुलसमनें जी हकीकत सांगितली त्याचा मीही एक साक्षी आहे. मीच तो ब्रह्मचारी."

कुलसमनें त्याला ओळखिलें आणि ती ह्मणाली "हाच तो."

नंतर चंद्रशेखर पुन्हां ह्मणाला "हुजूर, हा फिरंगी सत्यवादी आहे तर ह्याला आणखी एक दोन प्रश्न करावे."

नबाब ह्मणाला "तूंच विचार. दुभाष्याकडून त्याला समजावून सांग."

चंद्रशेखरानें विचारलें "तूं ह्मणालास कीं, चंद्रशेखर हें नाव मीं ऐकलें आहे—मीच तो चंद्रशेखर—तूं त्याचें—" चंद्रशेखराचें बोलणें संपतें न संपतें तोंच फॉष्टर ह्मणाला "आपण व्यर्थ कष्ट घेऊं नका. मी सर्वस्वीं आपल्या हातीं सांपडलों आहे. मी मरणाला भीत नाहीं. प्रश्नाचें उत्तर देणें अगर न देणें माझ्या खुषीवर आहे. आपल्या कोणत्याच प्रश्नाचें मी उत्तर देत नाहीं."

नबाबानें शैवलिनीला घेऊन येण्याचा हुकुम केला.

शैवलिनीला तेथें आणिलें. फॉष्टरनें प्रथम तिला ओळखलें नाहीं. ती अगदीं निस्तेज, अशक्त व क्षीण झाली होती. तिनें एक जीर्ण व मळकें वस्त्र परिधान केलें होतें व चोळी घातली नव्हती. तिचें सर्वांग धूलिधूसर झालें होतें. ती वेड्यासारखी हंसत होती व तिच्या चेहऱ्यावर वेडेपणाचें चिन्ह दिसत होतें. तिला पाहतांच फॉष्टरचा गोंधळ उडाला.

नबाबाने विचारलें "हिला ओळखतोस ?"

फॉष्टर—ओळखतों.

**नबाब**—ही कोण ?

**फॉष्टर**—शैवलिनी—चंद्रशेखराची पत्नी.

**नबाब**—तूं कशावरून ओळखलेंस ?

**फॉष्टर**—आपल्याला वाटेल तें शासन करा—मी उत्तर देत नाहीं.

**नबाब**—माझा अभिप्राय आहे कीं, तुला कुत्र्याकडून फाडफाडून खाववावें.

फॉष्टर काळाठिक्कर पडला. त्याचे हात पाय कापूं लागले. थोडावेळ गेल्यावर तो ह्मणाला "मला ठार मारण्याची आपली इच्छाच असेल तर अन्य प्रकारानें माझा वध करावा."

**नबाब**—नाहीं. ह्या देशांत अपराध्याला शिक्षा देण्याची एक प्राचीन चाल आहे. अपराध्याला कमरेपर्यंत मातींत पुरावयाचा—नंतर शिकविलेल्या कुत्र्यांकडून त्याच्या अंगाचे लोचके तोडवावयाचे—व त्या जखमेवर मिठाचें पाणी शिंपावयाचें. आणि नंतर अशा तऱ्हेनें मृतवत् झालेल्या अपराध्याला जिवंत पुरून टाकावयाचें. तुला व तकीला हीच शिक्षा योग्य.

नबाबाचें भाषण ऐकतांच तकीखानानें गुराप्रमाणें हंबरडा फोडला. व फाष्टर हात जोडून जमीनीवर बसला आणि आकाशाकडे दृष्टि लावून परमेश्वराची करुणा भाकूं लागला आणि मनांत ह्मणूं लागला. "हे परमेश्वरा, मी आजपर्यंत तुझी कधींही आठवण केली नाहीं—तुझा विचारही माझ्या मनांत कधीं आला नाहीं—आजपर्यंत मी पापच करीत आलों. तुझ्या अस्तित्वाची कल्पनाही माझ्या मनांत आली नाहीं. पण आज अगदीं अशरण होऊन तुला आळवीत आहें—तर हे अनाथाच्या नाथा, दयासिंधो, माझें रक्षण कर."

वाचकहो, तुह्मी विस्मित होऊं नका. जो ईश्वराला कधीं मानीत नाहीं तोच संकटांत सांपडला ह्मणजे ईश्वराचा धांवा करितो—अगदीं भक्तिभावानें धांवा करतो. तसाच फाष्टरही ईश्वराचा धांवा करीत होता.

इतक्यांत फाष्टरची दृष्टि तंबूच्या बाहेर गेली. अकस्मात एक जटाजूटधारी, काषायवस्त्रपरिहित, श्वेतस्मश्रुविभूषित व अंगास विभूति लाविलेला असा महापुरुष त्याच्या दृष्टीस पडला. फॉष्टर त्याजकडे सारखी टक लावून पाहूं लागला. कांहीं वेळानें त्याची दृष्टि जड होऊं लागली—जणुं काय गाढ निद्रेचा त्यावर अंमल बसूं लागला. तो जटाधारी पुरुष कांहीं बोलत आहे असा त्याला भास होऊं लागला. क्रमाक्रमानें त्याचा गंभीर ध्वनि फॉष्टरच्या कर्णांत शिरूं लागला. " मी तुझा मृत्यु चुकवितों. माझ्या प्रश्नाचें उत्तर दे. तूंच का शैवलिनीचा जार ?" इत्यादि प्रश्न तो पुरुष आपल्याला करतो आहे असें फॉष्टरला वाटलें.

फॉष्टरनें एकवार त्या धूलिधूसरित उन्मादिनी शैवालिनीकडे दृष्टि केली आणि तो ह्मणाला " नाहीं. "

" नाहीं. मी शैवलिनीचा जार नाहीं. " हें सर्वांनीं ऐकिलें.

पुन्हां पूर्वीच्याच गंभीर वाणीनें त्याला आणखी एक प्रश्न झाला. तो प्रश्न नबाबानें केला, कीं चंद्रशेखरानें केला, कीं दुसऱ्या कोणी केला तें फॉष्टरला समजलें नाहीं. " तर मग शैवलिनी तुझ्या नौकेंत कशाकरितां होती ?" अशा गंभीर अवाजानें आपल्याला कोणी तरी प्रश्न केला एवढेंच फक्त त्याला समजलें.

फॉष्टर ओरडून ह्मणाला " शैवलिनीच्या सौंदर्यानें मोहित होऊन मी तिला तिच्या घरांतून जबरीनें घेऊन आलों आणि आपल्या नौकेवर ठेविलें. तिचें मजवर प्रेम आहे असें मला वाटत होतें पण तो वृथा भ्रम होता. ती माझी वैरीण होती. नौकेमध्यें प्रथम भेटीच्या वेळीं ती हातीं सुरी घेऊन मजजवळ आली आणि ह्मणाली 'तूं जर माझ्या खोलींत आलास तर याच सुरीनें मी तुझा व माझा घात करीन. मी तुला आई बहिणीसारखी आहे.' तिच्याजवळ जाण्याची माझी छाती झाली नाहीं. मी तिला स्पर्श केला नाहीं. " सर्वांनीं ऐकिलें.

चंद्रशेखरानें विचारलें " तू हिला म्लेंच्छांचें अन्न कसें खाऊं घातलेंस ?"

फॉष्टर कुंठित झाला आणि ह्मणाला " आमचें अगर आह्मीं स्पर्श केलेलें अन्न हिनें एक दिवस देखील खाल्लें नाहीं. ही स्वतः आपलें अन्न तयार करीत असे. "

**प्रश्न**— काय अन्न तयार करी ?

**फॉष्टर**—फक्त भात आणि दूध.

**प्रश्न**— पाणी ?

**फॉष्टर**—ती आपल्या हातानें गंगेचें पाणी घेत असे.

ह्यावेळीं अकस्मात् " धुडुम् धुडुम् " असा शब्द कानीं आला. नबाब ह्मणाला " अं, हें काय ? "

इरफान् ह्मणाला दुसरें काय ? हें इंग्रजाचें सैन्य आपल्या छावणी-वर हल्ला करण्यास येत आहे. "

हळू हळू एक एक जण तंबूच्या बाहेर येऊं लागला. पुन्हां " दुडुम् दुडुम् " असा आवाज आला. रणवाद्यं वाजूं लागलीं व चोहोंकडून कोलाहल उसळला. घोड्यांच्या टापा, शस्त्रास्त्रांचे खणत्कार व सैनिकांचे जयध्वनि ह्यांचा समुद्रगर्जनेप्रमाणें आवाज निघूं लागला. धुरानें सर्व आकाश भरून गेलें. जणूं काय प्रळय कालच येऊन ठेपला असें सर्वांस वाटूं लागलें.

नबाबाचे अमीर उमराव व सैनिक तंबूबाहेर आले आणि कोणी रणभूमीकडे व कोणी दुसरीकडे निघून गेले. कुलसम, चंद्रशेखर, शैव-लिनी व फॉष्टर हींहीं बाहेर आलीं. तंबूमध्यें एकटा नबाब व बंदीवान तकी हेच काय ते राहिले.

इतक्यांत तोफेचा एक गोळा तंबूत शिरला. तत्क्षणींच नबाबानें आपल्या कमरेची तरवार म्यानांतून बाहेर काढिली आणि स्वहस्तानें तकीच्या छातींत भोंसकली. तकी मेला. नबाब तंबूचे बाहेर आला.

## अष्टम परिच्छेद.

### युद्ध-क्षेत्र.

चंद्रशेखर शैवलिनीला घेऊन तंबूच्या बाहेर येऊन पाहतो तों रमानंद स्वामी तेथें आलेले त्याच्या दृष्टीस पडले. स्वामी ह्मणाले " चंद्रशेखरा, आतां पुढें काय करणार ? "

**चंद्रशेखर**—ह्यावेळीं शैवलिनीचें रक्षण कसें करूं ? चोहोंकडून गोळ्यांचा वर्षाव होत आहे. चारी दिशा धुरानें भरून गेल्यामुळें चोहांकडे अंधकार पडला आहे. आतां जावें तरी कोठें ?

**रमानंद**—कांहीं चिंता नाहीं. यवनसेना कोणत्या दिशेला पळ काढते आहे तें दिसत नाही कां ? जेथें सुरुवातीलाच पराजयाला आरंभ, तेथें जयाची आशा कोठली ? हे इंग्रजलोक मोठे भाग्यवान्, बलवान् व कुशल आहेत. मला वाटतें हे कधींना कधीं हें अखिल भारतवर्ष पादाक्रांत करतील. चल आपण ह्या यवनसैन्याच्या पाठोपाठ जाऊं. तुला मला कांहीं काळजी नाहीं; फक्त शैवलिनीबद्दल काळजी आहे.

ते तिघेजण यवनसैन्याच्या पाठीमागून चालले. अकस्मात् समोरून एक सुसज्जित हिंदुसेना पर्वताच्या खिंडींतून येऊन इंग्रज सेनेच्या आघाडीवर चाल करून जात असलेली त्यांच्या दृष्टीस पडली. त्या सेनेच्या मध्यभागीं त्यांचा नायक घोड्यावर बसलेला होता. त्याला पाहतांच तो प्रताप आहे असें सर्वांनीं ओळखिलें. प्रतापाला पाहून चंद्रशेखर खिन्न झाला आणि ह्मणाला " प्रताप, तूं ह्या युद्धांत काय ह्मणून ? माघारा फीर. "

**प्रताप**—मी आपल्याच शोधार्थ निघालों आहें. चला, मी तुह्मांला सुरक्षित स्थळीं नेऊन पोंचवितों.

असें बोलून प्रतापानें त्या तिघांना आपल्या सैन्याच्या मध्यभागीं आणून ठेविलें आणि आपल्या सैन्याचा रोख फिरविला. पर्वतांतील सर्व गुप्त

मार्ग त्याला माहीत होते. लवकरच तो त्यांना रणभूमीपासून दूर घेऊन गेला. जातां जातां दरबारांत झालेली सर्व हकीकत चंद्रशेखराकडून त्याला समजली. नंतर चंद्रशेखर प्रतापाला ह्मणाला " प्रतापा, तूं मोठा धन्य आहेस, तुला जें माहीत आहे तें मलाही समजलें.

प्रताप विस्मित होऊन चंद्रशेखराच्या तोंडाकडे पाहूं लागला. कंठ भरून येऊन चंद्रशेखर ह्मणाला " ही निष्पाप आहे हें मला आतांच समजलें. जर लोकांच्या समजुतीकरितां कांहीं प्रायश्चित्त देण्याची जरूरी असेल तर देऊन हिला घरांत घेईन. पण ह्यापुढें माझ्या कपाळीं सुख नाहीं. "

**प्रताप**—असें का ? स्वामींच्या औषधानें कांहीं गुण दिसत नाहीं का ?

**चंद्रशेखर**—अजूनपर्यंत तर नाहीं.

प्रताप दुःखी झाला. त्याच्याही डोळ्याला पाणी आलें. शैवलिनीनें बुरख्यांतून तें [illegible] गाडी दूर सरली आणि हाताच्या इशाऱ्यानें तिनें प्रतापाला जवळ येण्याची खूण केली. प्रताप घोड्यावरून उतरला आणि तिच्या जवळ गेला. दुसऱ्या कोणाला ऐकूं जाणार नाहीं अशा हळू स्वरानें शैवलिनी प्रतापाला ह्मणाली " माझी एक गोष्ट मुकाट्यानें ऐकशील ? मी कांहीं निंद्य गोष्ट सांगत नाहीं. "

प्रताप विस्मित झाला आणि ह्मणाला " तुझें वेड कृत्रिम कीं काय ?"

**शैवलिनी**—ह्यावेळीं तसं आहे खरें. आज सकाळीं निजून उठल्यापासून मला सर्व गोष्टी आठवूं लागल्या. खरंच का मी वेडी झालें होतें ?

प्रतापाचें मुख प्रफुल्लित झालें. त्याच्या मनांतील आशय जाणून शैवलिनी त्याला ह्मणाली " चुप रहा. सध्यां कांहीं बोलूं नकोस. मीच स्वतः सर्व सांगेन तुझी अनुमति असेल तर. "

**प्रताप**—माझी अनुमति कशाला पाहिजे ?

**शैवलिनी**—पतींनीं माझा पुन्हां अंगिकार केला, तर मनांतलें पाप छपवून ठेवून त्यांची प्रणयभागिनी होणें उचित आहे काय ?

**प्रताप**—तुझी काय इच्छा आहे ?

**शैवलिनी**—पूर्वीची सर्व हकीकत त्यांना सांगून त्यांची क्षमा मागेन.

थोडा विचार करून प्रताप ह्मणाला " सांग, कांहीं हरकत नाहीं. आतां तूं पूर्णपणें सुखी हो, हा माझा तुला आशीर्वाद आहे " असें बोलून प्रताप मुकाट्यानें अश्रुवर्षण करूं लागला.

**शैवलिनी**—मी सुखी होणार नाहीं. तूं आहेस तोंपर्यंत मला सुख नाहीं—

**प्रताप**—हें काय ह्मणतेस ?

**शैवलिनी**—जोंपर्यंत तूं ह्या जगांत आहेस तोंपर्यंत माझ्या दृष्टीस पडूं नकोस. स्त्रियांचें चित्त ह्मणजे अति असार; किती दिवस तें ताब्यांत राहील त्याचा नियम नाहीं. सबब ह्या जन्मीं तूं माझ्या दृष्टीस पडूं नकोस.

त्यावर प्रतापानें उत्तर दिलें नाहीं. लागलींच तो घोड्यावर स्वार झाला आणि द्रुतगतीनें रणभूमीकडे निघाला. त्याचें सैन्य त्याच्या मागोमाग निघालें.

तो निघाला त्यावेळीं चंद्रशेखरानें त्याला हांक मारून विचारिलें "तूं कोठें जाणार ? "

प्रताप ह्मणाला " रणभूमीवर. "

चंद्रशेखर मोठ्यानें ओरडून ह्मणाला " जाऊं नकोस, जाऊं नकोस. इंग्रजाबरोबरच्या युद्धांत जय मिळणें नाहीं. "

**प्रताप**—फॉष्टर अजूनही जिवंत आहे, त्याचा वध करण्यास जातों.

धावत धांवत पुढें जाऊन चंद्रशेखरानें प्रतापाच्या घोड्याचा लगाम पकडला आणि तो ह्मणाला " फॉष्टरचा वध करण्याची जरूर नाहीं. परमेश्वर त्या दुष्टाला शासन करील. तुह्मी शासन करणारे कोण ? जे अधम असतात ते शत्रूचा सूड उगवितात व जे उत्तम असतात ते शत्रूला क्षमा करितात."

प्रताप विस्मित झाला. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. अशा प्रकारचे उदात्त विचार प्रतापाच्या कधींच कानीं पडले नव्हते. तो घोड्या-

वरून उतरला आणि त्यानें चंद्रशेखराची पदधूलि शिरीं धारण केली. आणि तो ह्मणाला " मनुष्यांमध्यें आपण. मोठे धन्य आहां. मी फॉष्टरला कांहीं करीत नाहीं. "

असें बोलून प्रताप पुन्हां घोड्यावर बसला आणि समरक्षेत्राकडे निघाला. चंद्रशेखर ह्मणाला " प्रतापा, आतां तूं समरभूमीवर कशाकरितां जातोस ? "

प्रतापानें तोंड फिरविलें आणि अति कोमल व अति मधुर हास्य करून तो ह्मणाला " माझें कांहीं काम आहे. " इतकेंच बोलून घोड्याला चाबुकाचा आघात करून शीघ्र वेगानें प्रताप निघून गेला.

त्याचें हास्य पाहून रमानंद स्वामी फार उद्विग्न झाले आणि चंद्रशेखराला ह्मणाले " तूं आपल्या स्त्रीला घेऊन घरीं जा. मी गंगास्नानास जातों. एक दोन दिवसांनीं भेट होईल. "

चंद्रशेखर ह्मणाला " प्रतापाकरितां मी फार उद्विग्न झालों आहें. "

रमानंद ह्मणाले " मी त्याची खबर काढून आणतों. "

इतकें बोलून रमानंद स्वामींनीं चंद्रशेखर व शैवलिनी ह्यांची रवानगी करून देऊन ते स्वतः समरभूमीकडे जाण्यास निघाले. त्या धूममय व जखमी झालेल्या लोकांच्या आर्त कल्लोलानें भरून गेलेल्या समरभूमीवर गोळ्यांच्या भयंकर वृष्टींत ते प्रतापाचा शोध करूं लागले. तेथें पाहतात तों शवांचा खच पडला आहे. कांहीं मृत, कांहीं अर्धमृत, कोणाचे अवयव तुटलेले, कोणाचें वक्षःस्थळ विदीर्ण झालेलें, कोणी " पाणी ! पाणी ! " असें ओरडत असलेले व कोणी आई, बाप, बंधु वगैरेंचीं नांवें घेऊन हांका मारीत पडलेले आहेत असे त्यांच्या दृष्टीस पडले. त्या सर्व प्रेतांमध्यें त्यांनीं प्रतापाचा शोध केला पण त्याचा पत्ता लागला नाहीं. कित्येक घोडेस्वार जखमी होऊन हातांतील शस्त्रास्त्रें फेंकून देऊन रणांतून पळ काढीत आहेत व त्यांच्या घोड्यांच्या पायाखालीं जखमी होऊन पडलेले वीर तुडविले जात आहेत असा देखावा त्यांना दिसला. त्यांच्यामध्येंही त्यांनीं प्रतापाचा शोध केला पण व्यर्थ. तसेच कित्येक पदाति शस्त्रास्त्रें

टाकून युद्धांतून पळून जात होते त्यांमध्येंही त्यानीं प्रतापाचा शोध केला पण तो सांपडला नाहीं.

अखेरीस थकून जाऊन रमानंद स्वामी एका झाडाखालीं बसले. तेथेंच एक शिपाई धांवत आला. रमानद स्वामींनीं त्याला विचारिलें " तुह्मी सर्व जण पळतां आहां–तर युद्ध कोण करतें आहे?

**शिपाई**—कोणी नाहीं. फक्त एक हिंदु मात्र भयंकर युद्ध करून राहिला आहे.

स्वामींनीं विचारिलें " तो कोठें आहे? " शिपाई ह्मणाला " किल्ल्याचे समोर पहा. " असें ह्मणून शिपाई निघून गेला.

रमानंद स्वामी किल्याकडे गेले. आणि पाहूं लागले तों तेथेंही युद्ध चालू नव्हतें. तेथें फक्त कित्येक इंग्रज व हिंदू यांच्या प्रेतांचा ढीग पडला होता. स्वामींनीं त्या प्रेतांमध्यें प्रतापाचा शोध केला. इतक्यांत तेथें जखमी होऊन पडलेल्या एका हिंदूनें गंभीर आर्तध्वनि केला. रमानंदांनीं त्याचा हात धरून त्याला थोडें बाजूस आणिलें आणि पाहूं लागले तों तो प्रताप ! तो अगदीं मृतप्राय झाला होता. त्याच्या अंगांत थोडी धुगधुगी मात्र होती.

स्वामी ह्मणाले " तूं लवकर बरा हो, हाच माझा तुला आशीर्वाद."

प्रताप मोठ्या कष्टानें ह्मणाला " हं, आतां बरा होण्याला फार विलंब नको. आपली पदधूलि माझ्या मस्तकीं ठेवा ह्मणजे झालें. "

रमानंद स्वामींनीं विचारिलें " मी निषेध केला असतां तूं युद्धास कां गेलास ? शैवलिनीच्या सांगण्यावरूनच कां तूं युद्धांत गेलास ? "

प्रताप ह्मणाला " आपण हें काय ह्मणतां ?

**स्वामी**—जेव्हां तूं शैवलिनीशीं बोलत होतास त्यावेळीं तिच्या आकारेंगितांवरून मला वाटलें कीं तिचें वेड गेलें. तसेंच ती तुला विसरली नाहीं हेंही मला समजून आलें.

**प्रताप**—शैवलिनीनें मला सांगितलें कीं, पुन्हां माझ्या दृष्टीस पडूं

नकोस. मी विचार केला कीं, जोंपर्यंत मी जिवंत आहे तोंपर्यंत शैव-लिनी व चंद्रशेखर हीं सुखी होण्याचा संभव नाहीं. ज्यांच्यावर माझी परम प्रीति व ज्यांनीं मजवर फार उपकार केले, त्यांच्या सुखाला प्रतिबंधक होऊन ह्या जगांत राहणें मला योग्य वाटलें नाहीं. ह्मणूनच आपण निषेध केला असतांही मी ह्या रणक्षेत्रावर प्राणत्याग करण्याकरितां आलों. मी जीवंत राहिलों तर शैवलिनींचें चित्त कधींना कधीं विचलित होण्याचा संभव असें जाणून मी युद्धास गेलों.

रमानंद स्वामींच्या डोळ्यांस पाणी आलें. आजपर्यंत त्यांच्या डोळ्याला पाणी आलेलें कोणी पाहिलें नव्हतें. ते ह्मणाले " ह्या जगांत तूंच खरोखर परहितव्रतधारी आहेस. आह्मी आपले नांवाचे मात्र. तूं परलोकीं अक्षय सुख भोगशील यांत संशय नाहीं. "

क्षणभर स्तब्ध राहून रमानंद स्वामी पुन्हां बोलूं लागले " वत्सा, ऐक. मी तुझा स्वभाव ओळखला. अखिल ब्रह्मांडाचा जय देखील तुझ्या इंद्रियजयापुढें फिक्का पडेल. तुझें शैवलिनीवर प्रेम होतें काय ? "

सुप्त सिंह जणुं काय जागृत झाला. तो मृतवत् पडलेला प्रताप एकदम बलिष्ट, चंचल व आवेशयुक्त होऊन ह्मणाला " आपण संन्यासी—आपल्याला कशी कल्पना होणार ? गेलीं सोळा वर्षें माझें शैवलिनीवर किती प्रेम होतें त्याची कल्पना कोणाला होईल ? माझें तिजवरचें प्रेम पापदृष्टीचें नव्हतें. माझ्या प्रेमाचें नांव जीवनविसर्जनाकांक्षा. माझ्या शिरांशिरांत, रक्तांत आणि हाडांत तें प्रेम रात्रंदिवस खेळत होतें. मनुष्याला त्याची कल्पना होणें नाहीं. मनुष्याला त्याची कल्पना होती तर आपण ह्या माझ्या अंतकाळीं मला असा प्रश्न कसा विचारतां ? त्या अमूल्य प्रेमाचें ह्या जन्मीं सार्थक नाहीं असें जाणून मी प्राणत्यागास उद्युक्त झालों. माझें मन कलुषित झालें आहे—शैवलिनीच्या मनाची स्थिति काय असेल तें कोणी सांगावें ? मृत्युशिवाय मला दुसरा मार्ग उरला नाहीं—ह्मणूनच मी मरणार. आपण आतां माझी सर्व हकीकत ऐकलीच आहे—आपण ज्ञानी, आपण शास्त्रदर्शी तर माझ्या पापाचें प्रायश्चित्त काय तें आपणच

सांगा. मी परमेश्वराच्या दृष्टीनें दोषी आहे काय ? जर दोषी असेन तर मी संकल्प केल्या प्रायश्चित्तानें त्याचें मोचन होईल काय ? "

रमानंद स्वामी म्हणाले " तें मला माहीत नाहीं. ह्या गोष्टींत मनुष्याचें ज्ञान असमर्थ व शास्त्रें मूक आहेत. तूं ज्या लोकीं जाणार त्या लोकच्या ईश्वराशिवाय ह्या प्रश्नाचें उत्तर दुसरा कोणीही देऊं शकणार नाहीं. मी इतकेंच सांगूं शकतों कीं, इंद्रियजयांत जर पुण्य असेल तर अनंत स्वर्ग तुझाच आहे. चित्तसंयमांत जर पुण्य असेल तर स्वर्गांतील देव देखील तुझ्याइतके पुण्यवान् नाहींत. परोपकारानें जर स्वर्गप्राप्ति असेल तर दधिचीपेक्षांही स्वर्गावर तुझा अधिक अधिकार आहे. माझी ईश्वराजवळ अशी प्रार्थना आहे कीं, त्यानें जन्मांतरी तरी मला तुजप्रमाणें इंद्रियजयी करावें. "

नंतर रमानंद स्वामी स्वस्थ बसले. हळूहळू प्रतापाचा प्राण निघून गला. तो अनिंद्यज्योति स्वर्णतरु चेतनारहित होऊन तृणशय्येवर पडला !

हे प्रतापा, तूं अनंतधामीं जा. ज्या ठिकाणीं इंद्रियजयांत कष्ट नाहीं. रूपांत मोह नाहीं, प्रणयांत पाप नाहीं त्या ठिकाणीं तूं जा. जेथें रूप अनंत, प्रणय अनंत, सुख अनंत, सुखांत पुण्य अनंत त्या ठिकाणीं तूं जा. जेथें दुसऱ्याचें दुःख दुसऱ्याला कळतें, दुसऱ्याचा धर्म दुसरे पाळतात, दुसऱ्याचा जय दुसरे गातात, दुसऱ्याकरितां दुसऱ्याला मरावें लागत नाहीं त्या महैश्वर्यमय लोकीं जा. त्या ठिकाणीं लक्ष शैवलिनी जरी तुझ्या पायाशीं लोळण घेत आल्या तरी त्यांजवर प्रेम करण्याचें तुझ्या मनांत कधींही येणार नाहीं.




